


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

येश कीर्ती प्रताप महिमा । आवडी वर्णावा परमात्मा ।
जेणें भगवभ्दक्तांचा आत्मा । संतुष्ट होये ।।
ताळ मृदांग हरिकीर्तन । संगीत नृत्य तान मान ।
नाना कथानुसंधान । तुटों चि नेदावें ।।



# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

**भाषा आणि जीवन**

वर्ष १३ : अंक ४ : दिवाळी १९९५



अनुक्रमणिका

अनुक्रम




**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन-समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७ (दूरध्वनी : ३५६०६१ / २४)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे - ४११ ००४ (दूरध्वनी : ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरण पृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

**संपादक :** कल्याण काळे **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी – मृणालिनी शहा
**मुद्रण स्थळ :** सहकार मुद्रणालय, ५४० गणेश पेठ, पुणे - २.

# पन्नासावा अंक

'भाषा आणि जीवन' चा हा अंक पन्नासावा आहे. 'भाषा आणि जीवन' ची मातृसंस्था, मराठी अभ्यास परिषद, १ जानेवारी, १९८२ रोजी अस्तित्वात आली. आता संस्थाही पंधराव्या वर्षात पदार्पण करीत आहे; आणि 'महाराष्ट्र फाउंडेशन' ने प्रत्येकी पन्नास हजार रुपयांच्या पारितोषिकासाठी निवडलेल्या तीन वैचारिक नियतकालिकांमध्ये 'भाषा आणि जीवन' ची नुकतीच निवड केली आहे. म्हणून या टप्प्यावर थोडे मागे वळून पाहावे, असे वाटणे साहजिकच आहे.

या नियतकालिकाचे नाव दुपदरी आहे. 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' हा त्यातील एक पदर. नियतकालिकांच्या नोंदणी करणाऱ्या कार्यालयाच्या दृष्टीने हे नाव अधिकृत आणि निरपवाद. वर्णनात्मक आणि दुसऱ्या कुणी न वापरलेले. पण मातृसंस्थेच्या कार्यकर्त्यांच्या दृष्टीने 'भाषा आणि जीवन' हा दुसरा पदर अधिक महत्त्वाचा, कारण त्यातून मातृसंस्थेचा दृष्टिकोन व्यक्त होतो. 'भाषेत जीवन काठोकाठ भरलेले असले, तर भाषाही जीवनात शिगोशीग भरून राहिलेली आहे.' (अंक १, पृष्ठ १)

'भाषा आणि जीवन' हे धंदेवाईक विचारवंतांनी धंदेवाईक विचारवंतांसाठी चालविलेले नियतकालिक नाही. भाषातज्ज्ञ आणि इतरेजन यांनी विचारांची आणि अनुभवांची देवाणघेवाण करावी, परस्परांपासून शिकण्यासारखे असेल, ते शिकावे, आणि त्याद्वारे आपल्या समाजाचे भाषिक आणि सामाजिक जीवन विकसित आणि समृद्ध व्हावे, या हेतूने निर्माण केलेले हे व्यासपीठ आहे. मराठीतून हे प्रकाशित होत असले, तरी ते मराठीपुरते मर्यादित नाही. मराठी भाषकांच्या सर्वच भाषिक गरजा भागविण्याचा प्रयत्न करणे हे मराठी अभ्यास परिषदेचे उद्दिष्ट आहे आणि ते साध्य करण्याचे 'भाषा आणि जीवन' हे एक साधन आहे. भाषिक गरजा या केवळ शिक्षण, व्यवसाय, अर्थार्जन यांच्यापुरत्या सीमित नसतात. व्यक्तीचे व समाजाचे मानसिक, सामाजिक आणि सांस्कृतिक पोषण भाषेतून घडत असते. त्यासाठी कोणतीही एकच भाषा पुरी पडण्याचा संभव- जागतिकीकरणाच्या आधुनिक रेट्यात तर विशेषत्वाने- कठीण दिसते. इतर भाषांतील ज्ञान, माहिती, साहित्य यांचा यथार्थ परिचय व संस्कार

आपल्या भाषेच्या विकासाला हातभार लावू शकतो. जीवनाच्या बदलत्या रूपांना व आव्हानांना सामोरे जाण्याइतकी क्षमता व लवचिकता भाषेमध्ये असेल, तर ती तिचा वापर करणाऱ्यांच्या गरजा भागवू शकते. केवळ प्रतिशब्द, परिभाषा, भाषांतरे करण्याने भाषा विकसित होऊ शकत नाही. त्यासाठी नवीन संकल्पना, नवे अनुभव भाषेत व जीवनात मुरवावे लागतात. या मुरवण्याच्या प्रक्रियेला हातभार लावण्याचा प्रयत्न 'भाषा आणि जीवन' ने आपल्या परीने गेल्या ४९ अंकांतील २५०० हून अधिक पृष्ठांमध्ये केला आहे.

आमचे हे उद्दिष्ट वाचकांपर्यंत पोचवण्याचा आमचा प्रयत्न 'भाषा आणि जीवन' च्या सर्व अंगांतून वाचकांना जाणवला असेल. नियतकालिकाचे पहिले दर्शन असते, ते त्याच्या मुखपृष्ठाचे. 'भाषा आणि जीवन' च्या पहिल्या चार वर्षांतील अंकांवर अनिल अवचटांनी रेखांकित केलेले मोर वाचकांना भेटले. (मोर हे सरस्वतीचे वाहन आणि आपला राष्ट्रीय पक्षी आहे.) त्यानंतर पाच वर्षे भाषिक संज्ञापनाचे व्यंग्यचित्ररूप दर्शन शि. द. फडणिसांनी घडविले. बालम केतकरांची चित्र-कविता, शाम देशपांड्यांची लिपिचित्रे, संतकाव्यातील वेचक उद्‌धृते, आणि लोककला यांचे दर्शन नंतरच्या अंकांच्या मुखपृष्ठांवर घडले. या मुखपृष्ठांची अर्थपूर्णता वाचकांच्या नक्कीच लक्षात आली असेल.

'भाषा आणि जीवन' ची संपादकीये संपादन-समितीच्या सभासदांनी लिहिलेली असतात. मातृसंस्थेच्या उद्दिष्टांशी सुसंगत अशा विषयांवरील या संपादकीयांमध्ये त्यामुळे विषय, दृष्टिकोन, मांडणी व शैली या बाबतींत विविधता आली. 'भाषा आणि जीवन' मधील विविध सदरे, त्या सदरांची नावे, पानपूरके यांमधूनही आमच्या प्रयत्नांचा प्रत्यय वाचकांना यावा. 'दखलपात्र', 'ज्याची त्याची प्रचीती', 'पुनर्भेट', 'विचारसंकलन', 'भाषानिरीक्षण', 'शंका आणि समाधान', 'पुस्तक-परीक्षण', इत्यादी सदरांमध्ये तज्ज्ञ आणि इतरेजन यांना सारखाच वाव आहे. 'भाषा आणि जीवन' मध्ये कवितांना स्थान आहे, साहित्याला स्थान आहे, त्याचप्रमाणे प्रशासन, कायदा, वैद्यक यांनाही आवर्जून जागा देण्यात आली आहे. त्याच्यात मराठी भाषकांबरोबरच गुलाबदास ब्रोकर, श्यामविमल, इरिना ग्लुश्कोव्हा, मॅक्सीन बर्न्सन अशा अन्य भाषकांनीही लेखन केले आहे. भाषाविज्ञान, भाषाध्यापन, सुलेखन, नाटक, चित्रपट, वृत्तपत्रे, मुलाखत, लोकशिक्षण, अनुवाद, अशा अनेक विषयांवरील लेख 'भाषा आणि जीवन' ने छापलेले आहेत. लेखसूची, संदर्भसूची, लेखनसूची, साहित्यसूची, शब्दसूची, परिभाषासूची अशा विविध सूची उपलब्धतेनुसार छापण्यावरही आमचा कटाक्ष आहे. केवळ मराठीच नव्हे, तर अन्य भाषांबद्दलचे लेखन आणि अन्य भाषांमधील लेखनाचे अनुवादही आम्ही छापले. भाषेच्या अभिमानाचे दुरभिमानात, हेकटपणात आणि इतर भाषांबद्दलच्या तुच्छतेत रूपांतर होऊ नये, असे मराठी अभ्यास परिषदेला वाटते. त्या भूमिकेचा पाठपुरावा करण्याचा प्रयत्न आम्ही 'भाषा आणि जीवन' मध्ये

केला आहे.

'भाषा आणि जीवन' चे अंक ठरवलेल्या वेळीच प्रकाशित होतात, असे नाही. याची आम्हांला जाणीव आहे. अलिकडच्या एक-दोन अंकांतील छपाईही समाधानकारक नव्हती. आम्हांला जाणवणाऱ्या तीन प्रकारच्या अडचणींचे ते दृश्य रूप आहे. लेखनाचा तुटवडा, कबूल केलेले लेखन वेळेवर (आणि कधी अजिबात) हाती न येणे ही पहिली अडचण. लेखकांशी प्रत्यक्ष व टपालाने संपर्क साधणे, नवीन लेखक शोधणे, विषयांची यादी देऊन त्यावरील लेख पाठविण्याचे जाहीर आवाहन करणे असे काही उपाय या पहिल्या अडचणीवर मात करण्यासाठी आम्ही वापरले. दुसरी अडचण आर्थिक क्षमतेच्या अभावाची. सभासदांची वर्गणी, साहित्य, आणि संस्कृती मंडळाचे अनुदान आणि आता महाराष्ट्र फाउंडेशनने दिलेले पारितोषिक यांमुळे आर्थिक अडचण काही प्रमाणात दूर होते. तरीही कागद व मुद्रणाच्या वाढत्या दरांमुळे आणि टपालखर्चामुळे आर्थिक अडचण आमची यापुढेही सोबत करीत राहील, अशी शक्यता आहे. मुद्रण-तंत्रात होणारे बदल आणि त्यामुळे वेळोवेळी करावी लागलेली नवी मुद्रणव्यवस्था ही आमची तिसरी अडचण. तीही आम्ही प्रयत्नपूर्वक दूर करीत आहोत.

आत्तापर्यंत आम्हांला वाचकांनी उत्साहवर्धक प्रतिसाद दिला आहे. आमच्या प्रयत्नांचे त्यांनी स्वागत केले, कौतुक केले, काही वेळा आमच्या चुकाही दाखवून दिल्या. पण त्यांच्या यापेक्षा अधिक सहभागाची आम्हांला अपेक्षा आहे. प्रसिद्ध झालेल्या लेखनाबद्दलच्या प्रतिक्रिया पाठवण्याबरोबरच त्यांनी लेखनसहकार्यही करायला हवे. ऐकू येणारे संवाद, इतरत्र वाचायला मिळालेले वैशिष्ट्यपूर्ण लेखन, भाषेच्या वापराबद्दलची आपली निरीक्षणे, इ. अनेक गोष्टींबद्दल त्यांना लिहिता येईल. विशेषतः, पानपूरकांसाठी त्यांना मजकूर पाठवता येईल. पानपूरके हे 'भाषा आणि जीवन' चे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. त्यांची संख्या रोडावल्यामुळे 'भाषा आणि जीवन' मधील पांढऱ्या जागेचे प्रमाण अलीकडे वाढले आहे. वाचक जागरूक राहिले, तर पुन्हा एकदा पानपूरकांचे पीक चांगले येईल, अशी आम्हांला आशा आहे.

'मराठी अभ्यास परिषदे' ची स्थापना १ जानेवारी, १९८२ ला झाली आणि १९८३ च्या तिसऱ्या तिमाहीत 'भाषा आणि जीवन' चा पहिला अंक बाहेर पडला. त्यानंतर 'का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था', 'महाराष्ट्र प्रतिष्ठान' या अ-शासकीय संस्थांची आणि शासनपुरस्कृत 'राज्य मराठी विकास संस्थे' ची स्थापना झाली. त्यामुळे मराठी अभ्यास परिषदेने आपल्यासाठी आखून घेतलेले कार्यक्षेत्र किती महत्त्वाचे व तातडीचे आहे, हे सिद्ध झाले. एखाद्या कार्याला जेवढे जास्त हात लागतील, तितके ते अधिक हलके होते आणि आटोक्यातही येते. शासकीय पातळीवरील संस्थेकडे जशा अनेक सुविधा असतात, तशा तिच्यावर अनेक मर्यादाही असतात. सामाजिक व आर्थिक विकासाच्या विविध कामांमध्ये शासनाला अशासकीय संस्थांचे भरघोस व महत्त्वाचे साहाय्य होऊ शकते, ही वस्तुस्थिती आता केंद्र व राज्य शासनांनीही मान्य

केली आहे. म्हणून शासकीय पातळीवरील संस्थेने उद्या एखादे नियतकालिक सुरू केले, तरी 'भाषा आणि जीवन' ची गरज संपणार नाही. याउलट, नुकत्याच जाहीर केलेल्या पारितोषिकामुळे 'भाषा आणि जीवन' बद्दलच्या अपेक्षा वाढल्या आहेत आणि त्यामुळे आमची जबाबदारीही वाढली आहे, याची आम्हांला जाणीव आहे. वाचकांच्या प्रेमाबरोबरच त्यांचा सक्रिय सहभाग वाढत्या प्रमाणात मिळाला, तर आमचे काम सोपे होईल, असा आम्हांला विश्वास वाटतो.

**प्रभाकर नारायण परांजपे**



---

वाग्वैदग्ध्यविराजितं नवनवोन्मेषकाव्यान्वितम्।

गीताऽऽलापकलापितं च भगवल्लीलाविलासीकृतम्।

यत्स्याद्यत्र किलावलंब्य महतां पद्यं सुबोधप्रदम्।

तस्मिंश्चेदुपसंहृतं भुवि वरं प्रोक्तं हरेः कीर्तनम्॥

(ह.भ.प. विनायकबुवा भागवत यांच्या 'कीर्तनाचार्यकम्' मधून)

(डॉ. यशवंत पाठक यांच्या 'नाचू कीर्तनाचे रंगी' या ग्रंथामधून उद्धृत)

शब्दरचना, वाक्यरचना इ. वाक्चातुर्याने शोभविलेले, नव्या नव्या अर्थाच्या कवितांनी युक्त असलेले, गाण्याच्या आलापांनी फुलविलेले, नटविलेले, परमेश्वराच्या लीलांनी सुशोभित असे, ज्यात साधुसंतांचे एखादे उपदेशप्रद पद प्रमाणभूत घेऊन विवेचन केलेले असेल आणि त्यानेच उपसंहार केलेला असेल तेच हरिकीर्तन भूतलावर श्रेष्ठ समजले जाते.

# व्हॅलन्स थिअरी : धारणाक्षमता विचार

**नीती बडवे**

**प्रास्ताविक :**

विसाव्या शतकामधे भाषेकडे बघण्याच्या दृष्टिकोनात आमूलाग्र बदल झाला. या पूर्वीच्या काही शतकांमधे प्रामुख्याने व्युपत्तिशास्त्राच्या अंगाने तौलनिक भाषाभ्यास झाला. भाषेकडे तत्त्वज्ञान, तर्कशास्त्र, वाङ्मय यांसाठी लागणारे माध्यम म्हणून बघितले गेले. मात्र विसाव्या शतकात भाषेला तिचे म्हणून अस्तित्व आहे, तिचे असे स्वतंत्र स्थान आणि व्यक्तिमत्त्व आहे, अशी जाणीव निर्माण झाली.

फेर्दिनांद द सोस्यूर या स्विस भाषावैज्ञानिकाच्या भाषाविचाराचा विसाव्या शतकातील भाषाविज्ञान-विकासावर, विशेषतः पाश्चात्त्य जगात, फार व्यापक परिणाम झालेला दिसतो. म्हणूनच त्याला सर्वसामान्यपणे आधुनिक भाषाविज्ञानाचा जनक मानतात. १९१६ साली, मरणोत्तर प्रसिद्ध झालेल्या त्याच्या पुस्तकात भाषा-विश्लेषणाचे काही मूलभूत मुद्दे उपस्थित केलेले आढळतात.[१] त्यानंतर भाषेच्या कालक्रमिक (diachronic) अभ्यासाबरोबरच एककालिक (synchronic) अभ्यास होऊ लागला आहे. 'भाषा म्हणजे काय', या प्रश्नाचा विचार करताना, तसेच एका विशिष्ट भाषेचे विशिष्ट काळातले वर्णन करताना तिच्या रचनावैशिष्ट्यांना प्राधान्य प्राप्त झाले. पुस्तकी भाषेपेक्षा बोली भाषेच्या विश्लेषण-वर्णनावर भर दिला गेला. भाषा ही अंतर्गत नातेसंबंधांची एक व्यवस्था आहे, या सोस्यूरच्या प्रतिपादनाकडे लोकांचे लक्ष वेधले गेले, असे दिसते.

**परस्परावलंबी व्याकरण-विचार :**

'परस्परावलंबी/परस्पराश्रित' (Dependence Grammar) आणि 'पदबंधरचनात्मक' व्याकरण (phrase structure Grammar) या वर्णनात्मक भाषाविज्ञानातल्या विसाव्या शतकाच्या मध्याला विकसित झालेल्या महत्त्वाच्या आणि बहुचर्चित अशा दोन व्याकरण- विचारप्रणाली आहेत. 'पदबंध रचनात्मक' भाषाविचार प्रामुख्याने अमेरिकेत विकसित झाला. याच परंपरेचा प्रसिद्ध प्रतिनिधी नोऑम चॉम्स्की आहे आणि त्याचा surface and deep structure सिद्धान्त हा दूरगामी परिणाम

साधणारा ठरला आहे. 'परस्परावलंबी व्याकरण' विचाराचा विकास आणि पुरस्कार प्रामुख्याने युरपीय भाषावैज्ञानिकांनी केलेला दिसतो. या विचाराचा परिपाक 'धारणाक्षमता सिद्धान्तामधे' झालेला दिसतो.

ल्यूसियाँ तेनिये (१८९३-१९५४) हा फ्रेंच भाषावैज्ञानिक हा या सिद्धान्ताचा प्रणेता आहे. त्याच्या १९५९ मधे मरणोत्तर प्रसिद्ध झालेल्या पुस्तकात त्याने धारणाक्षमता सिद्धान्ताचा सविस्तर विचार केलेला दिसतो.[१] हे मूळ पुस्तक फ्रेंच भाषेत लिहिलेले आहे. पण आपले विचार स्पष्ट करण्यासाठी तेनियेने फ्रेंचबरोबरच जर्मन, ग्रीक्, अरेबिक अशा त्याला उत्तम अवगत असलेल्या अनेक भाषांमधली उदाहरणे दिली आहेत आणि त्यांचे विश्लेषण केले आहे.[३]

### तेनियेचा धारणाक्षमता सिद्धान्तः

हा सिद्धान्त रचनात्मक भाषाविचाराच्या दृष्टिकोनातून वाक्यविन्यासाची एक पद्धत मांडतो. आपण एखादे वाक्य बोलतो किंवा लिहितो, तेव्हा भाषाघटक एकानंतर एक, म्हणजे साखळीसारखे वापरले जातात किंवा प्रत्यक्षात उतरतात. पण विसाव्या शतकात प्रथमच असा विचार मांडला गेला, की भाषारचना दिसते, तशी नसते. म्हणजे वाक्यात येणारे घटक हे काही सरळ रेषेत ओळीने येणारे आणि समान दर्जाचे नसतात, तर या घटकांमधे एक प्रकारची उतरंड लावता येते. या घटकांचे एकमेकांशी संबंध हे श्रेणिबद्ध (hierarchical) आणि परस्परावलंबी असतात. भाषारचना सरळ ओळीसारखी दिसली, तरी वाक्याची त्यामागची घडण ही त्यातील नातेसंबंधांवर अवलंबून अशी पायऱ्या-पायऱ्यांची असते.

तेनिये आपले विचार मांडताना प्रथम एक उदाहरण घेतो.[४] संदर्भ 'अल्फ्रेड गातो.' (Alfred sings) हे वाक्य किती घटकांचे बनले आहे? यावर तेनियेचे उत्तर आहे. 'तीन घटकांचे', कसे? तर या वाक्यात 'अल्फ्रेड' आणि 'गातो' ही दोन पदे आहेत. पण ही दोन पदे एकमेकांशेजारी ठेवून त्यांतून वाक्य निर्माण होऊ शकत नाही, तर या दोन पदांमधे काही विशिष्ट नातेसंबंध निर्माण व्हावा लागतो. तो असला, तरच पदांचे वाक्य बनू शकते. म्हणून हा 'नातेसंबंध' हा अतिशय महत्त्वाचा असा या वाक्यातला तिसरा घटक आहे. या वाक्याचा आराखडा तो असा दाखवतो.

आकृती (१)

गातो

| ←— नातेसंबंध (connexion)

अल्फ्रेड

'गातो' हे क्रियापद वरच्या श्रेणीवर असून 'अल्फ्रेड' हे 'वाक्यांग' क्रियापदावर अवलंबून आहे आणि ते खालच्या श्रेणीवर आहे. म्हणून त्यांचा नातेसंबंध दोन श्रेणींना

जोडणाऱ्या उभ्या दंडाने दाखवला आहे.

तेनिये आणखी काही वाक्यांची आराखड्यात अशी मांडणी करतो.

आकृती (२)




आकृती (३)




'अल्फ्रेड ऑटोला मारतो' आणि 'अल्फ्रेड कार्लला पुस्तक देतो' या उदाहरणांमधेही क्रियापदे 'मारतो' आणि 'देतो' ही उच्चस्तरावर आहेत. 'अल्फ्रेड' आणि 'ऑटोला' ही पहिल्या उदाहरणातली 'वाक्यांगे', तसेच, 'अल्फ्रेड' 'कार्लला' आणि 'पुस्तक' ही दुसऱ्या उदाहरणातली 'वाक्यांगे' ही क्रियापदांवर अवलंबित असून, ती सर्व समानस्तरीय आहेत.

अशा रीतीने तेनियेच्या मते 'मार' या क्रियापदाचे वाक्य तयार करण्यासाठी कमीत कमी दोन, तर 'दे' या क्रियापदाचे वाक्य तयार करण्यासाठी तीन 'वाक्यांगांची' आवश्यकता असते.

**वाक्यविस्तार :**

आपण या वाक्यांचा विस्तार करून, उदाहरणार्थ, असेही म्हणू शकतो, की 'अल्फ्रेड ऑटोला रोज पट्टीने मारतो'. या उदाहरणाचा आराखडा पुढीलप्रमाणे दाखवता येईल.

आकृती (४)




म्हणजे 'मारतो' या क्रियापदावर अवलंबून अशी चार 'वाक्यांगे' या वाक्यात आहेत आणि ती समस्तरीय आहेत.

**वाक्यांगे :**

आता ही वाक्यांगे म्हणजे काय? तर वाक्यांगे ही वाक्याची अंगे किंवा भाग किंवा घटक असतात. ती एका किंवा अनेक पदांची बनलेली असतात. हे एक पद किंवा हा पदसमूह मिळून एकत्रितपणे एका वाक्यामधे एक कार्यभार सांभाळत असतो. (fulfills one function) ह्या एकत्रित पदसमूहाच्या जागी एक तरी पर्यायी प्रतिशब्द (anapher), सर्वशब्द (proword) त्या भाषेत उपलब्ध असतो. उदाहरणार्थ :

'अल्फ्रेड शेजारच्या कार्लला आपल नवं पुस्तक देतो.' सर्वनामे वापरून, वाक्य 'तो त्याला ते देतो' असेही म्हणता येईल.

हे आराखड्यात असे दाखवता येईल : आकृती (५)




आकृती (६)




आकृती (५) मधे पदसंख्या वाढली असली, तरी आकृती (५) आणि (६) मधे वाक्यांगांची संख्या तीच राहिली आहे. आपण जर कोणाला प्रश्न विचारला, 'कोणाला देतो?' तर उत्तर असेल. 'कार्लला', किंवा 'शेजारच्या कार्लला' किंवा फक्त 'त्याला' म्हणजे 'कार्लला' किंवा 'शेजारच्या कार्लला'. यात घटकांची संख्या भिन्न असली, तरी त्यांचे एकच सामाजिक कार्य (function) आहे आणि त्यांच्या जागी 'त्याला' हे एकच पुरुषवाचक सर्वनाम वापरता येऊ शकेल. म्हणून 'शेजारच्या कार्लला' हे एकच वाक्यांग आहे. तसेच, 'आपलं नावं पुस्तक' हेही एकच वाक्यांग आहे. याप्रमाणे कधीकधी संपूर्ण उपवाक्यही एक वाक्यांग असे शकते. उदा., 'राजाने ब्राह्मणाला सांगितले, तू उद्या ये.'

आकृती (७)




हे वाक्य वरच्या आकृतीत दाखवल्याप्रमाणे एकूण तीन वाक्यांगांचे बनले आहे. एक : कोणी सांगितले? 'राजाने'. दोन : कोणाला सांगितले? 'ब्राह्मणाला'; आणि तीन : काय सांगितले? 'तू उद्या ये.'

अशा रीतीने वाक्यांग हे पदसंख्येवर अवलंबून नसून, पदसमूहाने मिळून करायच्या समाईक कार्यावर अवलंबून असते.

(५) आणि (७) या वरील आराखड्यांमध्ये स्तरांची संख्या वाढलेली दिसते. क्रियापदे ही उच्चस्तरावर, त्यावर अवलंबून वाक्यांगे ही खालच्या स्तरावर आणि विस्तारित वाक्यांगाचे घटक आणखी खालच्या स्तरावर दिसतात. म्हणजेच आकृती (५) मधे 'देतो' हा नियंत्रक आणि 'अल्फ्रेड', 'कार्लला' आणि 'पुस्तक' हे नियंत्रित घटक आहेत, तर 'कार्लला' आणि 'पुस्तक' हे पुन्हा 'शेजारच्या' आणि 'आपलं नवं' या नियंत्रित घटकांचे नियंत्रकही आहेत. म्हणजे 'कार्लला' आणि 'पुस्तक' हे परस्परावलंबी मांडणीमधे कधी नियंत्रिताची, तर कधी नियंत्रकाचीही भूमिका करताना दिसतात. नियंत्रक हे दोन नियंत्रितांचे जोडणबिंदू असतात. त्यांना तेनिये 'nexus' म्हणतो आणि वाक्य हे श्रेणिबद्ध जोडणबिंदूंचे बनलेले असते. नियंत्रक आणि नियंत्रित हे उभ्या दंडाने दाखवलेल्या नातेसंबंधांनी म्हणजे तेनियेच्या शब्दात connexion ने एकमेकांशी जोडलेले असतात.

**वाक्यांगांचे वर्गीकरण :**

कोणतेही क्रियापद उच्चारल्यावर आपल्या मनात चटकन् काही प्रश्न उभे राहतात. उदा., 'खातो' : कोण? काय? 'पाठवतो' : कोण? कोणाला? काय? 'बोलतो' : कोण? कोणाशी? काय? 'वाचतो' : कोण? काय? या प्रश्नांची उत्तरे ही या क्रियापदांपासून व्याकरणदृष्ट्या लघुतम परिपूर्ण वाक्य बनवण्यासाठी आवश्यक असतात. उदा., आकृती (४) मधे मांडलेले वाक्यः 'अल्फ्रेड ऑटोला रोज पट्टीने मारतो.' त्यामध्ये क्रियापद आहे : 'मारतो.' एकूण वाक्यांगे आहेत चार. पण मनात प्रथम प्रश्न उभे राहतात, ते : 'कोण?' आणि 'कोणाला?' म्हणजे 'अल्फ्रेड' आणि 'कार्लला' ही अत्यावश्यक वाक्यांगे झाली, कारण 'मारतो' या क्रियापदाला त्यांची गरज आहे. म्हणजेच ही वाक्यांगे 'क्रियापदनिष्ठ' आहेत आणि केव्हा? कसे? याविषयी माहिती देणारी 'रोज' आणि 'पट्टीने' ही वाक्यांगे 'आनुषंगिक' वाक्यांगे आहेत. सर्व वाक्यांगांचे 'क्रियापदनिष्ठ' आणि 'आनुषंगिक' असे वर्गीकरण हे तेनियेच्या सिद्धान्ताचे मूलभूत तत्त्व आहे.[५] ५) उदा., 'सरोज आपल्या लहान मुलीला झोपण्यापूर्वी नेमाने रामायणातली एक नवी गोष्ट सांगते.' या वाक्यात १) 'सरोज' २) 'आपल्या लहान मुलीला' ३) 'झोपण्यापूर्वी' ४) 'नेमाने' ५) 'रामायणातली एक नवी गोष्ट', 'सांगते' ही वाक्यांगे आहेत. त्यांपैकी कोण? काय? आणि कोणाला सांगते? ही 'सांगते' साठी 'क्रियापदनिष्ठ' वाक्यांगे आहेत. केव्हा? आणि कशी? ही 'आनुषंगिक' वाक्यांगे आहेत. काही संदर्भात मात्र क्रियापदनिष्ठ वाक्यांगातीलही काही वाक्यांगे गळू

शकतात.

उदा., सरोज काय करते? -'ती गोष्ट सांगते.' यामधे 'मुलीला' हे वाक्यांग गळू शकते. म्हणून क्रियापदनिष्ठ वाक्यांगांमधेही अपरिहार्य आणि 'परिहार्य' असे पोटवर्ग करता येतात. म्हणून वरच्या उदाहरणामधे वाक्यांगे एकूण पाच.

आकृती (७)




या ५ वाक्यांगांचे वर्गीकरण वरीलप्रमाणे दाखवता येईल.

इथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे, की 'क्रियापदनिष्ठ' वाक्यांगे ही व्याकरणदृष्ट्या महत्त्वाची असली, तरी 'आनुषंगिक' वाक्यांगे ही संज्ञापनाच्या दृष्टीने बहुधा अधिक महत्त्वाची असतात, महत्त्वाचा तपशील देतात. म्हणून वाक्यांगांचे व्याकरणमूल्य आणि संज्ञापनमूल्य (grammatical and communicative value) यांत फरक करणे आवश्यक आहे. 'धारणाक्षमता' ही व्याकरणमूल्याधिष्ठित संकल्पना आहे.

## 'धारणाक्षमता' म्हणजे काय?

'व्हॅलन्स' किंवा 'धारणाक्षमता' ही रसायनशास्त्रातली एक संज्ञा आहे, एक पारिभाषिक शब्द आहे. दोन मूलद्रव्ये एकमेकांशी संयोग पावतात आणि त्यातून नवीन द्रव्य तयार होते, अशा वेळी ही मूलद्रव्ये एका विशिष्ट ठरावीक प्रमाणामध्ये एकत्र येतात. उदा., पाण्याचे सूत्र $H_2O$ असे आहे. इथे हैड्रोजनचे प्राणवायूशी संयोग पावण्याचे प्रमाण हे २:१ असेच असते. म्हणजेच या संयोगामध्ये हैड्रोजनची धारणाक्षमता, त्याचे बल, त्याचा भार हा दोन असतो.

तेनियेने ही रसायनशास्त्रातली संज्ञा भाषाशास्त्रात रुजवली. तो म्हणतो : क्रियापद काही ठरावीक प्रश्न उभे करते. काही ठरावीक रिकाम्या जागा स्वतःभोवती निर्माण करते. त्या काही ठरावीक वाक्यांगांनी भरल्यानंतरच व्याकरणदृष्ट्या परिपूर्ण असे लघुतम वाक्य तयार होऊ शकते. क्रियापदाच्या या ठरावीक वाक्यांगांशी संयोग पावण्याच्या बलाला तेनिये क्रियापदाची 'धारणाक्षमता' म्हणतो. प्रत्येक क्रियापद हे

आपल्या धारणाक्षमतेनुसार वाक्यांगांची संख्या निश्चित करते. म्हणून तेनिये क्रियापदांच्या धारणाक्षमतेनुसार त्यांचे वर्गीकरण असे करतो.[६]

**तेनियेचे क्रियापदांचे वर्गीकरण :**

१) avalente = शून्य धारणाक्षमतेची : उदा., It rains.

२) monovalente = एक धारणाक्षमतेची : उदा., Alfred sings

३) divalente = दोन धारणाक्षतेची : उदा., Alfred beats Otto.

४) trivalente = तीन धारणाक्षमतेची : उदा., Alfred gives Carl a book.

'It rains' या वाक्यामधे 'it' हे स्वतंत्र वाक्यांग होऊ शकत नाही, कारण त्याच्या जागी इतर कोणतेही पद किंवा शब्द हे समानअर्थी प्रतिशब्द (anaphora) म्हणून वापरता येत नाहीत. त्यामुळे 'it' हा क्रियापदाचाच भाग मानावा लागतो. हे वाक्य इतर वाक्यांगांच्या साहाय्याने विस्तारित करता येते. उदा., It rained (1) heavily (2) yesterday night. आता या वाक्यात दोन वाक्यांगे आहेत. पण ती दोन्ही व्याकरणदृष्ट्या लघुमत वाक्यरचनेसाठी आवश्यक नाहीत. 'to rain' हे क्रियापद त्यांची मागणी करत नाही. म्हणजेच ही दोन्ही वाक्यांगे 'क्रियापदनिष्ठ' (verbspecific) नाहीत, तर 'आनुषंगिक' आहेत; आणि त्यामुळे या क्रियापदाची धारणाक्षमता दाखवत नाहीत. म्हणून 'to rain' ची धारणाक्षमता शून्य आहे.

**तेनियेची पायाभूत तत्त्वे :**

तेनिये गृहीत धरतो : वाक्ये आणि वाक्यांगे श्रेणिबद्ध असतात. वाक्यांगे आणि पदे ही नियंत्रकाची आणि नियंत्रिताची भूमिका करत असतात. क्रियापद हे मात्र सर्वोच्च नियंत्रक आहे. इतर सर्व वाक्यांगांची श्रेणी समान आहे. वाक्यरचनेचे वर्णन तो श्रेणिबद्ध असे करतो. दोन श्रेणींमधल्या अमूर्त नातेसंबंधांची मांडणी तो उभ्या दंडाने करतो. वाक्यांगांचे वर्गीकरण तो प्रथमतः (१) क्रियापदनिष्ठ (२) आनुषंगिक अशा मोठ्या गटात करतो. क्रियापदनिष्ठ वाक्यांगांचे तो (१अ) अपरिहार्य आणि (१ब) परिहार्य (म्हणजे संदर्भात गाळल्या जाऊ शकणाऱ्या) अशा दोन उपगटांत करतो. तेनिये आराखड्यात मांडतो, ते मूर्त वाक्याचे विघटन नसते, तर पदांच्या आणि वाक्यांगांच्या अमूर्त अशा अंतर्गत नातेसंबंधांच्या आलेखांची तो मांडणी करतो.

**तेनियेच्या सिद्धान्तावर टीका:**

या सिद्धान्तावरच्या टीकेतला पहिला मुद्दा असा, की क्रियापदच सर्वोच्च नियंत्रक का? 'अल्फ्रेड गातो' या वाक्यात 'अल्फ्रेड' या पदावर 'गातो' अवलंबून आहे, की 'गातो' या पदावर 'अल्फ्रेड' अवलंबून आहे, हे ठरवणे अवघड आहे. ही चर्चा करीत

असताना अवलंबित्वाचा प्रश्न हा या दोन पदांचे morphological forms (रूपाकृती) आणि त्यांचे agreement (संवाद) एवढ्यापुरताच मर्यादित नाही, तर त्यांच्या अंतर्गत नातेसंबंधाचा प्रश्न हा महत्त्वाचा आहे. त्या दृष्टीनेही केवळ क्रियापदाला इथे नियंत्रक ठरवायला काही लोक आक्षेप घेतात.

दुसरा आणि अधिक महत्त्वाचा मुद्दा म्हणजे, वाक्यांगांचे फक्त तीनच प्रकार क्रियापदनिष्ठ आहेत का ? आणि क्रियापदांचे तेनियेने केलेले संख्यात्मक वर्गीकरण खूप संदिग्ध आहे, पुरेसे नाही.

**तेनियेच्या सिद्धान्ताचा विकास :**

हे टीकेचे मुद्दे लक्षात घेऊन काही युरोपीय भाषाशास्त्रज्ञांनी, विशेषतः, जर्मन भाषाशास्त्रज्ञांनी (Helbig, Schenkel, Engel) धारणाक्षमतेच्या संकल्पनेचा पुढे पाठपुरावा केला. जर्मन भाषेमधे एङ्गेल या शास्त्रज्ञाने आधी दहा, [७] आणि नंतर एकूण अकरा[८] क्रियापदनिष्ठ वाक्यांगांचे प्रकार निश्चित केले. उदाहरणार्थ, 'सुनील राहतो' किंवा 'सुनील आहे' या रचना इंग्रजी किंवा जर्मनमधे 'Sunil stays' किंवा 'Sunil is' अशा स्वरूपात पूर्ण वाक्ये म्हणून मान्य होण्यासारख्या नाहीत. तसेच, 'Munich lies / is situated' (म्यूनिक वसले आहे) 'The meeting continued' (सभा चालली), 'It took... to do' (करायला लागले), 'It increased' (ते वाढले) हे वाक्यखंड आहेत. ते अनुक्रमे 'कुठे राहतो ?' 'काय' आहे ? 'कुठे' वसले आहे ? 'किती वेळ' चालली ? 'किती तास' लागले ? 'किती' वाढले ? असे प्रश्न निर्माण करतात आणि त्यावर अनुक्रमे 'या घरात' राहतो, 'माझा मित्र' आहे, म्यूनिक 'इझार नदीवर' वसले आहे, 'खूप वेळ' चालली, 'दोन तास' लागले, 'दोन किलो' वाढले, अशा तऱ्हेची उत्तरे अपेक्षित आहेत. ही उत्तरे सामावल्यानंतरच त्यांची व्याकरणदृष्ट्या लघुतम परिपूर्ण अशी वाक्ये तयार होतील. म्हणजेच ही उत्तरे ही 'क्रियापदनिष्ठ वाक्यांगे' आहेत आणि त्यांचा विचार तेनियेच्या मूळ ग्रंथात केला गेलेला नाही. परंपरेने चालत आलेले कर्त्याचे, कर्माचे किंवा अप्रत्यक्ष कर्माचे कार्य करणाऱ्या पदसमूहांचाच क्रियापदनिष्ठ वाक्यांगे म्हणून तेनियेने प्रामुख्याने विचार केलेला दिसतो. पण कालवाचक, स्थलवाचक, परिमाणवाचक, दिशादर्शक अशा विधिविशेषणात्मक पदबंधांचाही काही क्रियापदांच्या वाक्यरचनांमधे क्रियापदनिष्ठ वाक्यांगे म्हणून विचार करायला पाहिजे, असे भाषावैज्ञानिकांना आढळून आले.

एङ्गेल या भाषावैज्ञानिकाने त्याच्या १९७८ मधे प्रसिद्ध झालेल्या धारणाक्षमतेनुसार रचलेल्या क्रियापदकोशात[९] जर्मन भाषेत एकूण १० क्रियापदनिष्ठ वाक्यांगांचे प्रकार नमूद केले आणि त्यांनुसार सूत्रे रचली. पण १९८८ मधे प्रसिद्ध झालेल्या त्याच्या

व्याकरणात त्याने आणखी एका वाक्यांगप्रकाराची भर घालून ११ वाक्यांगप्रकारांची नोंद केलेली आढळते.

**एङ्गेलने केलेली जर्मन भाषेतल्या क्रियापदनिष्ठ वाक्यांगप्रकारांची नोंद :**

| कोड नं. | नाव | उदाहरण |
|---|---|---|
| ० | प्रथमा | ही ***मुलगी*** हुशार आहे. |
| १ | द्वितीया | ती ***प्रश्न*** विचारते. |
| २ | षष्ठी | ***पैशाचं*** बोला. |
| ३ | चतुर्थी | ***मला*** पत्र लिही. |
| ४ | उत्तरयोगी | माधवचं *रमे**वर*** प्रेम आहे. |
| | | तो आपल्या *गावा**बद्दल*** बोलला. |
| ५ | स्थितिदर्शक | तो ***पुण्यात*** राहतो. |
| | (situative) | सभा ***खूप** वेळ* चालली. |
| | (स्थान किंवा कालदर्शक) | |
| ६ | दिशादर्शक | ती गाडी *मुंबई**हून*** आली. |
| | | तो ***भुसावळला*** गेला. |
| ७ | नामदर्शक | ते ***शिक्षक*** आहेत. |
| | (nominal) | त्यांना *'राजे**साहेब**'* म्हणतात. |
| ८ | विशेषणात्मक | तो ***आजारी*** आहे. |
| ९ | विधि/क्रियादर्शक | त्याला इथे ***राहू*** दे. |
| | (verbative) | |

नंतर यात मिळवलेला ११ वा वाक्यांगप्रकार 'expansion' म्हणून आहे. त्याला मराठीत 'परिमाणदर्शक' म्हणता येईल. उदा., 'तो एक कि.मी. चालला.'[१०]

वर दाखवल्याप्रमाणे प्रत्येक वाक्यांग-प्रकाराला एक कोडनंबर देण्यात आला. प्रथमा म्हणजे (०), द्वितीया म्हणजे (१), इत्यादी. शून्यापासून सुरुवात केल्यामुळे १० प्रकारांत सर्व संख्या १ स्थान असलेल्या म्हणजे single digit च्या होत्या. त्या एकामागे एक लिहून सूत्र तयार होत असे. वरच्या उदाहरणांमधेच आलेल्या क्रियापदांची सूत्रे काय होतील, ते पाहू.

आहे = (०) मुलगी (८) हुशार म्हणून 'अस' चे सूत्र <०८> असे झाले. पण 'हुशार' च्या जागी आपण 'नर्तिका' असे नामही वापरू शकतो. इथे 'अस' चे सूत्र <०७> असे होईल. नंतरच्या वाक्यात 'विचारते' हे क्रियापद आहे. त्याचे सूत्रः 'विचार'

= <०१ (३> असे देता येईल. (०) म्हणजे कर्ता, (१) म्हणजे प्रत्यक्ष कर्म (३) म्हणजे अप्रत्यक्ष कर्म; पण ते संदर्भात गाळता येते. म्हणून उलट्या कंसांत घातले आहे. म्हणजे ते इथे 'क्रियापदनिष्ठ', पण 'परिहार्य' असे वाक्यांग आहे. याप्रमाणे एङ्गेलने आपल्या वर उल्लेखलेल्या 'धारणाक्षमतेच्या क्रियापदकोशात' सर्व महत्त्वाच्या क्रियापदांची सूत्रे उदाहरणांसकट दिलेली आहेत. उदा.,

to eat सूत्र : ०(१

to narrate सूत्र : ०१(३

to bring सूत्र : ०१ (६ इत्यादी.

ही सूत्रे ही क्रियापदानुसार दिलेली असून, यांत अपरिहार्य आणि परिहार्य क्रियापदनिष्ठ वाक्यांगे वेगळी दर्शवली आहेत.

'क्रियापदनिष्ठ' वाक्यांगांच्या निरनिराळ्या जुळणींतून (permutation - combinations मधून ) एकूण किती प्रकारची जर्मन वाक्ये बनवणे शक्य आहे, याचा विचार करून एङ्गेलने आपल्या या कोशात एकूण महत्त्वाची अशी १८ नमुनावाक्ये दिली आहेत. नमुनावाक्यांची सविस्तर चर्चा तो पुन्हा त्याच्या १९८८ मधे प्रसिद्ध झालेल्या 'जर्मन व्याकरणात' करतो. तिथे त्याने जर्मन भाषेतल्या अशा एकूण ४९ नमुनावाक्यांची नोंद केली आहे. या व्याकरणातच वर उल्लेख केलेला ११ वा वाक्यांगप्रकारही त्याने नमूद केला आहे. पण या व्याकरणात मात्र (दहाच्यावर वाक्यांगप्रकार झाल्यामुळे असावे) तो कोडनंबर न वापरता सगळीकडे वाक्यांगांच्या नावांचे म्हणजे 'प्रथमा','द्वितीया', 'गुणदर्शक', 'नामदर्शक' वगैरेचे शॉर्टफॉर्म्स वापरतो. एङ्गेलच्या या धारणाक्षमता क्रियापदकोशाखेरीज आणखी असा एक क्रियापदकोश हेल्बिश आणि शेन्केल या दोन पूर्व जर्मन भाषावैज्ञानिकांनी एङ्गेलच्या बऱ्याच आधी तयार केलेला होता.[११] या क्रियापदकोशामधे क्रियापदाबरोबर धारणाक्षमता आणि वाक्यांगप्रकार यांची नोंद करून शिवाय semantic compatibility (आर्थिक सुसंगती) साठी लागणाऱ्या तपशिलांचीही नोंद केलेली आहे. उदा. einschlaten = to fall asleep.

einschlafen = Sn (=नामः प्रथमेत, कर्ता,धारणाक्षमता १)

Sn. = Anim 1) The soldier / the bird falls asleep.

Abstr. 2) The old customs fall asleep

Inanim. 3) The leg falls asleep.

Expl. : If 'Abstract', the meaning of the verb changes to
= to end, stop.

If 'Inanimate', it means
= to become benumb.

प्रत्येक क्रियापदापासून व्याकरणदृष्ट्या परिपूर्ण असे लघुतम वाक्य बनवण्यासाठी किती आणि कोणती वाक्यांगे आवश्यक आहेत, याचा विचार करून, म्हणजेच क्रियापदाचा धारणाक्षमतेच्या अंगाने विचार करून वर उल्लेखलेले दोन कोश जर्मन भाषेतल्या क्रियापदांसाठी तयार केले गेले. त्यांत वाक्यरचना सूत्ररूपात मांडून दाखवल्या. क्रियापदांच्या अशा स्वतंत्र शब्दकोशांखेरीज सर्वसामान्य शब्दकोशातही धारणाक्षमता सूत्रांचा उपयोग करून घेतलेला दिसतो. तिथे क्रियापदांच्या नोंदीसमोर सूत्रे दिलेली आहेत.[12] याशिवाय जर्मन ही परभाषा म्हणून शिकण्यासाठी आणि शिकवण्यासाठी धारणाक्षमता सिद्धान्तावर आधारित असे खास चर्चात्मक आणि वर्णनात्मक व्याकरण तयार केले गेले.[13]

## धारणाक्षमता कोशाचे महत्त्व

सर्वसामान्य शब्दकोशामधे एका क्रियापदाचे वेगवेगळे अर्थ दिलेले असतात. या शब्दकोशामधे वेगवेगळ्या अर्थांबरोबर येणाऱ्या वाक्यरचनांचा आणि त्यासाठी लागणाऱ्या 'क्रियापदनिष्ठ वाक्यांगांचा'ही विचार केलेला आहे. त्याचबरोबर semantic compatibility साठी तपशीलही दिलेले आहेत. उदा., liegen = to lie हे क्रियापद. चार वेगळ्या अर्थांबरोबर या क्रियापदाच्या वाक्यरचना बदलतात, म्हणजेच या क्रियापदाची धारणाक्षमता बदलते. त्याची नोंद या शब्दकोशात मिळते.

ही उदाहरणे आपण मराठीत भाषांतरित केली, तर या भाषांतरित वाक्यांचा मराठी वाक्यरचनेच्या अंगांनी विचार करावा लागेल, त्यांचा जर्मन वाक्यरचनांशी काहीच संबंध नसेल. उदा., 'The book is lying on the table.' चे मराठीत 'ते पुस्तक टेबलावर आहे' असेही भाषांतर पुरेसे आहे. किंवा 'ते पुस्तक टेबलावर पडले आहे' असेही करता येईल. पण जर्मन क्रियापद 'liegen' च्या इतर रचना मराठीमधे भलत्याच शब्दांनी भाषांतरित कराव्या लागतील. त्यात 'पडणे' हे क्रियापद वापरता येण्याची शक्यताच नाही.

आपण स्वतंत्रपणे मराठीतल्या 'पडणे' या क्रियापदाची उदाहरणे बघितली, तर त्याच्या वापरावरून त्याची वेगवेगळी धारणाक्षमता निश्चित करावी लागेल. क्षणभर वर दिलेले जर्मन उदाहरणांचे कोडनंबर घेऊन पुढील रचना बघू.

शिरीष पडला <0> कर्ता.

शिरीष स्कूटरवरून पडला <० (६> कर्ता, दिशादर्शक

शिरीष खड्ड्यात पडला <० (६> कर्ता, दिशादर्शक

शिरीष गादीवर पडला. <०> (गादीवर = आनुषंगिक?)

तो रस्त्यात पडला. <०> (रस्त्यात = आनुषंगिक ?)

त्याचा जीव भांड्यात पडला. <०(६> कर्ता, दिशादर्शक.

तो गरीब पडला. <०८> कर्ता, विशेषणात्मक.

त्याला स्वप्न पडलं. <०३> कर्ता, चतुर्थी

त्याला काम पडलं. <०३> कर्ता, चतुर्थी

वरील कोणती वाक्यांगे 'क्रियापदनिष्ठ', कोणती 'आनुषंगिक', कोणती 'अपरिहार्य क्रियापदनिष्ठ', कोणती 'परिहार्य क्रियापदनिष्ठ', यावर चर्चा होऊ शकेल. पण लक्षात घेण्याचा मुद्दा इतकाच, की मराठी भाषा शिकणाऱ्या इंग्रजी माणसाने 'to lie' म्हणजे 'पडणे' एवढेच शिकून भागण्यासारखे नसते.

मराठी भाषा योग्य रीतीने वापरण्यासाठी त्याला 'धारणाक्षमता सूत्रांचा' निश्चितच उपयोग होईल. तसेच, आपण इतर परकीय भाषा शिकतानाही इतर भाषेतल्या धारणाक्षमता सूत्रांचा आपल्याला उपयोग होईल, कारण दोन भाषांमधल्या Syntactic structures मधे साम्य नसते. इंग्रजीतल्या एकाच तऱ्हेच्या रचनेचे मराठीत भाषांतर केल्यावर वेगळेच रचनाप्रकार होतात.

He likes her = त्याला ती आवडते.

He remembers her = त्याला तिची आठवण होते.

He loves her = त्याचं तिच्यावर प्रेम आहे.

## धारणाक्षमता सिद्धान्ताची वैशिष्ट्ये

हा सिद्धान्त अनेक भाषांना लागू करता येतो. त्याच्या वापराची व्यापक शक्यता हा एक महत्त्वाचा मुद्दा आहे.

एकेका भाषेतले वाक्यरचनेचे नमुने या सिद्धान्तानुसार निश्चित करता येतील.

एकेका भाषेतल्या क्रियापदांसाठी धारणाक्षमता सूत्रे निश्चित करता येतील.

अशी सूत्रे ही प्रत्येक भाषेतल्या वाक्यरचना अतिशय थोडक्यात मांडण्यासाठी एक प्रभावी साधन आहेत, economic मार्ग आहे.

वाक्यरचनांचे मूठभर आणि आकड्यात निश्चित करता येण्याजोगे नमुने त्या भाषेतल्या अनंत वाक्यरचनांचे प्रतिनिधित्व करू शकतील.

प्रत्येक भाषेतल्या वाक्यरचना ठोकपणे सूत्ररूपात नियमबद्ध करण्याची सोय या सिद्धान्ताद्वारे होत असल्यामुळे एकूणच भाषेच्या विश्लेषणासाठी, तसेच, अध्ययन-अध्यापनासाठी याचा चांगला उपयोग करून घेता येतो, विशेषतः, परभाषा शिकवण्यासाठी.

ही सूत्रे वाक्यप्रकार (प्रश्नार्थी, उद्गारवाचक, इ.) किंवा काळ (भूत,भविष्य,

इ.) किंवा mood (कर्तरी, कर्मणी) यावर अवलंबून नसतात.

क्रियापदाचे मूळ सूत्र वरील निकषांवर अवलंबून नसल्यामुळे अबाधित राहते.

हा सिद्धान्त भाषेकडे बघण्याचा, तसेच वाक्यरचना आणि वाक्यविघटन करण्याचा एक नवा दृष्टिकोन देतो.

सरळ रेषेतल्या मूर्त वाक्याची आराखड्यात मांडणी केली जाते, तेव्हा ती भाषेतल्या पदांची आणि घटकांची मांडणी नसून पदांमधल्या अमूर्त नातेसंबंधाची उतरंडच अशा आकृतिबंधातून पुढे येते.

पारंपरिक वाक्यविश्लेषणात उद्देश्य आणि विधेयक अशी विभागणी केली जाते. तेव्हा उद्देश्याला म्हणजेच कर्त्याला विधेयकाबरोबर समान दर्जा प्राप्त होतो. म्हणजेच कर्मे आणि विधिविशेषणे यांच्या तुलनेत कर्त्याला एक विशेष स्थान असते. पण या सिद्धान्ताच्या मांडणीनुसार क्रियापद हे सर्वोच्च नियंत्रक असते. कर्ता हा इतर वाक्यांगाप्रमाणे एकाच स्तरावर असतो आणि इतर वाक्यांगांबरोबरच क्रियापदावर अवलंबून असणारा एक नियंत्रित असतो.

धारणाक्षमता सिद्धान्त हा केवळ क्रियापदासाठी मर्यादित नाही. तर परस्परावलंबी व्याकरण विचारात नामे आणि विशेषणांनाही हा सिद्धान्त लागू करण्याचा प्रयत्न जर्मनमध्ये झाला आहे.[१४]

मराठीमधे नामांसाठी या सिद्धान्ताचा विचार करता येईल.

**मराठी वाक्यरचना आणि धारणाक्षमता विचार :**

मराठी भाषेतल्या वाक्यरचनांच्या निरीक्षणावरून मराठी भाषेतल्या 'क्रियापदनिष्ठ वाक्यांगांची' संख्या आणि त्यांचे प्रकार सर्वप्रथम निश्चित करावे लागतील. हे अतिशय महत्त्वाचे पाऊल आहे. त्यानंतर या वाक्यांगांच्या जुळणीतून मराठी वाक्यरचनांमधे किती नमुने आहेत, हे ठरवता येईल. तसेच, क्रियापदांची सूची करून त्यांना लागणारी वाक्यांगे सूत्ररूपात देता येतील.

आतापर्यंत 'धारणाक्षमता सिद्धान्त' मराठीत मांडलाच गेलेला नाही. म्हणून मुख्य अडचण परिभाषेची आहे. त्याचप्रमाणे निरीक्षणाची आणि चपखल उदाहरणे शोधण्याचीही आवश्यकता आहे. थोड्या निरीक्षणातून काही उदाहरणे खाली दिली आहेत. त्यांत आवश्यक ती भर टाकून आणि त्यांची सविस्तर चर्चा करून मराठीतील एकूण क्रियापदबद्ध वाक्यांगांची संख्या आणि प्रकार निश्चित करावे लागतील.

**मराठीमधील क्रियापदबद्ध वाक्यांगे**

*उदाहरणे*

१) उजाडले.

२) ***सूर्य*** उगवला.

३) ***रामने*** आंबा खाल्ला.

४) रामने ***चहा*** घेतला.

५) दीपक ***रमाला*** गोष्ट सांगतो.

६) ***सुधीरला*** फणस आवडतो. ***मला*** एक बहीण आहे.

७) ***सुषमाचं*** काही तरी बिनसलं.

८) रमेश ***मुंबईहून*** आला. त्याने ***मुंबईला*** फोन केला.

९) वाराणसी ***गंगेवर*** वसलं आहे. त्या ***बाजूला*** देऊळ आहे. नीला ***शनिवार पेठेत*** राहते.

१०) ***वैमनस्यातून*** हे घडलं. ***प्रेमानं*** तो आंधळा झाला. ***तिच्यापुढं*** त्याला काही सुचत नव्हतं. ***त्यामुळं*** तिला येता आलं नाही.

११) त्याला ***बरं*** वाटतं. त्यातून ***सुटल्यासारखं*** झालं.

१२) मीना ***त्रासून*** गेली. ती ***आजारी*** पडली.

१३) सभा ***चार तास*** चालली. तो ***१ कि. मी.*** चालला.

१४) तो डोंगर ***उंच*** आहे. सतीश ***हुशार*** आहे.

१५) तो ***डॉक्टर*** झाला. तो स्वतःला ***राजा*** समजतो.

१६) सुहास त्याला ***काका*** म्हणतो. सगळे त्याला ***वेडा*** म्हणतात.

१७) त्यांनी ***योजनेविषयी*** माहिती दिली. तो ***पक्ष्यांवर*** बोलला.

१८) ***लढण्यासाठी*** सज्ज राहा.

१९) स्नेहा हर्षला आपल्या घरी ***खेळू देते.*** ती म्हणाली, ***परत ये.*** त्यांनी मला सामान ***उचलायला*** मदत केली.

२०) ***त्यांच्या हस्ते*** जागेचं उद्‌घाटन झालं.

वरील उदाहरणांची सविस्तर चर्चा करून, क्रियापदांचे आणि वाक्यांगांचे प्रकार ठरवावे लागतील.

अ) 'उजाडलं', 'अंधारलं', 'झाकोळलं', 'ढगाळलं' ही पूर्ण वाक्ये आहेत का ? तत्त्वतः ही क्रियापदे एकटी वापरणे शक्य असले, तरी प्रत्यक्षात अशी उदाहरणे आढळतात का ? की 'मग ढगाळलं', 'तेव्हा सांजावलं' अशी वाक्यांगे नेहमी बरोबर असावी लागतात ? 'उजाडलं' हे संपूर्ण वाक्य असेल, तर 'उजाडणे' या क्रियापदाची धारणाक्षमता शून्य आहे आणि तिचे सूत्र : उजाडणे <–> असे देता येईल.

आ) उदा. (२) मधे 'सूर्य' आणि (३) मधे 'रामने' ही वाक्यांगे एकच, म्हणजे 'कर्त्याचे' कार्य करतात का? मग त्यांना एकच वाक्यांग म्हणून 'कर्ता' असे नाव देऊन (O) असा कोडनंबर द्यायचा का?

इ) उदा. (५) मधे 'रामला' आणि (६) मधे 'सुधीरला' ही दोन्ही चतुर्थीची रूपे आहेत का? ही दोन्ही वाक्यांगे एकच कार्य करतात का? त्यांना काय म्हणायचे आणि वेगळे कोडनंबर द्यायचे का?

ई) 'सुषमाचं काही तरी बिनसलं', 'सुषमाचं घर भरलं' यात 'सुषमाचं' हे बाह्यात्कारी रूप एक असलं, तरी दुसऱ्या वाक्यात 'सुषमाचं' हा 'सुषमाचं घर' या वाक्यांगाचा फक्त एक भाग आहे, स्वतंत्र वाक्यांग नाही.

उ) (१०) खाली दिलेली वाक्यांगाची उदाहरणे एकच कार्य दर्शवणारी आहेत का? ती एकाच वाक्यांगप्रकारात मोडतात का? (११) आणि (१२) खाली दिलेल्या उदाहरणात copula आणि गुणदर्शक असा फरक करण्याची आवश्यकता आहे का?

ऊ) (१६) मधे '-वर' हे उत्तरयोगी तर, (९) मधे '-वर' हे स्थलदर्शक, हा भेद आवश्यक आहे का?

ए) (१७) मधे 'लढण्यासाठी' त '-साठी' हे हेतुदर्शक, की उत्तरयोगी?

ऐ) उदा. (१९) मधे 'त्यांच्या हस्ते' हे काय वाक्यांग आहे? हे आनुषंगिक वाक्यांग आहे का?

मुळात मराठीत क्रियापदे कोणती आणि क्रियापदांची अंगे कोणती, हेच मुद्दे अजून विचाराधीन आहेत. 'मदत कर', 'अंघोळ कर', 'सादर कर', 'प्रस्तुत कर', 'खोळंबा कर', 'दुरुस्त कर' या सर्व (आणि इतर) वापरांमधे केवळ 'कर' हेच क्रियापद मानायचे का? त्यातल्या इतर पदांचे स्थान, दर्जा, वाक्यांगप्रकार काय? असे मूलभूत प्रश्न या निमित्ताने परत चर्चेला घ्यावे लागतील.

वर दिलेली उदाहरणे ही विचार करताना सहज पुढे आलेली उदाहरणे आहेत. ती मराठीतील सर्व वाक्यांग प्रकार दाखवणारी असतीलच, असे नाही. इथे काही उदाहरणे देऊन केवळ विचाराला चालना देण्याचा (आणि मिळवण्याचाही) हा एक प्रयत्न आहे. वरपांगी समान रचना दाखवणाऱ्या वाक्यांमधे वाक्यांगांचे प्रकार आणि वाक्यांगांची एकमेकांशी नाती किती वेगळी असू शकतात, हे खाली दिलेल्या काही गमतीच्या उदाहरणांवरून दृष्टोत्पत्तीस येईल.

१) त्याने सिंहगडवर कविता केली.

त्याने सिंहगडवर कविता केली.

२) मुलगी घरात आली. (मुडात/झोपेला/रडकुंडीला)

मुलगी वयात आली.





अनुक्रमणिका

ती गोत्यात आली.

गोष्ट प्रचारात आली.

३) तो त्याला वेडा म्हणतो.

तो स्वतःला राजा समजतो.

तो मला मराठी शिकवतो.

४) ***माझ्याकडे*** ते पुस्तक आहे.

***माझ्याकडे*** बघ.

५) ***त्याचा*** फोटो बघ.

***त्याचा*** स्वीकार कर.

६) ***दीपकची*** खात्री पटली.

***बहिणीची*** ओळख पटली.

७) तो ***टीव्हीवर*** गाणी म्हणतो.

तो ***प्रेमावर*** गाणं म्हणतो.

८) तो ***डोंगरावर*** चढतो.

तो ***डोंगरावर*** राहतो.

तो ***डोंगरावर*** बोलतो.

९) ती अभिनय ***करू लागली.***

तिथे गाणी ***सुरू झाली.***

१०) शिरीष संतोषला ***पुस्तक देतो.***

शिरीष संतोषला ***मदत करतो.***

११) हा विश्वासघात ठरेल.

हा विजयी ठरेल.

१३) घोड्यावर ***स्वार हो***

***आयुष्यमान*** हो.

यावरून मराठी वाक्यरचनांचा अजून विविध अंगांनी विचार होण्याला बराच वाव आहे, असे वाटते.

**परकीय भाषा विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००४**

**संदर्भसूची**

१) de Saussure, Ferdinand Cours de linguistique





अनुक्रमणिका

generale, published by Bally V.C. and A Sechelhaye, Paris/Laussanne, 1916.

२) Tesniere, Lucien : Elements de syntaxe structurale, Paris, 1959

३) या लेखात पुढे आलेले संदर्भ हे तेनियेच्या वर उल्लेख केलेल्या फ्रेंच पुस्तकाच्या जर्मन अनुवादावरून दिलेले आहेत. भाषांतरकार आणि संपादक : Engel, Ulrich : Grundzüge der strukturalen Syntax, Stuttgart, 1980. तेनियेच्या मूळ पुस्तकात ६० हून अधिक भाषांमधली उदाहरणे तेनिये देतो : Engel, 1980 पान १७.

४) Engel, 1980 : पान २५. इथे Altred speaks असे उदाहरण जर्मन भाषेत दिले आहे.

५) Engel, 1980 : पान ९७ आणि ११४ 'क्रियापदनिष्ठ' साठी मूळ फ्रेंच शब्द 'actants' जर्मन : Ergänzungen, आणि 'आनुषंगिक' साठी 'Circonstances', जर्मन Angaben असे आहेत. तेनियेच्या प्रतिपादनात 'actants' ही सर्वसाधारणपणे नामे, तर 'circonstances' ही क्रियाविशेषणे आहेत. 'क्रियापदनिष्ठ' (verbspecific) च्या जागी 'क्रियापूरक' अशीही पारिभाषिक संज्ञा वापरता येईल.

६) Engel, 1980 पान ९७

७) Engel, U; Schümacher, H. : Kleines Valenzlexikon deutscher Verben, Tübingen, 2,1978.

८) Engel, U. : Deutsche Grammatik, Heidelberg, 1988.

९) ही उदाहरणे 'Kleines Valenzlexikon' (संदर्भ ७ पाहा) मधून घेतली आहेत, पान २६.

१०) वाक्यांगाचे हे नाव आणि हे उदाहरण एङ्गेलच्या व्याकरणात (संदर्भ ८ पाहा) नमूद केलेले आहे.

११) Helbig, G; Schenkel, W. : Wörterbuch Valenur und Distribution deutscher Verben, Leipzig, 1969.

१२) Wahrig Wörterbuch

१३) Rall, M; Engel, V; Rall, D. : DVG für DaF. Dependenz verbgrammatik für Deutsch als Fremdsprache, Heidelberg, 1977.

१४) Sommerfeld, E., Schreiber, H : Wörterbuchzur Valenz und Distribution deutscher Adjektive, Leipzig, 1983.



**पुनर्भेट**

# देवनागरी मुद्राक्षरकला

**दीपक घारे**

देवनागरी लिपी हा भारतीय संस्कृतीचा कणा आहे. कारण देवनागरीचा विकास ब्राह्मी लिपीशी आणि संस्कृत वाङ्मयाशी संबंधित आहे. आठव्या ते दहाव्या शतकात पूर्णावस्थेला पोचलेली ही लिपी १८६० च्या सुमारास मान्यता पावली, ती मुख्यतः देशी-परदेशी मुद्रित झालेल्या नागरी लिपीतील संस्कृत ग्रंथांमुळे. जवळजवळ निम्मे भारतीय लोक आणि त्यांच्या भाषा देवनागरीच्या प्रभावाखाली येतात. आता तर शासकीय व्यवहार हिंदी व मराठीत करण्याचे धोरण असल्यामुळे देवनागरी लिपीला रोमन लिपीइतकेच महत्त्व आले आहे. गेल्या शंभर वर्षांत लिपीसुधारणेचे अनेक प्रयत्न झाले. बदलत्या तंत्रज्ञानाला अनुसरून त्यात थोडे-फार फेरबदल केले गेले. त्यात लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, स्वातंत्र्यवीर सावरकर अशा राजकीय पुढाऱ्यांचाही सहभाग होता. उच्चारानुसार निर्दोष लिहिण्याची क्षमता देवनागरीत आहे, तितकी ती उर्दू किंवा रोमन लिपीत नाही, असे गांधीजींचेही मत होते. देवनागरी मुद्राक्षरकलेचा विचार करताना हे सारे संदर्भ ध्यानात ठेवणे जरुरीचे आहे.

देवनागरी ही एका अर्थाने अजूनही विकसनशील लिपी आहे. याचे कारण असे, की काही बाबतींत अजून एकवाक्यता झालेली नाही. रोमन लिपीमध्ये अशी भिन्नता नाही. दुसरे असे, की रोमन मुद्राक्षरांना पाचशे वर्षांचा इतिहास आहे. तंत्रज्ञानाच्या विकासाबरोबरच मुद्राक्षरांचा आणि मुद्रणाचा विकास झाला. याउलट, देवनागरी मुद्राक्षरकला फार तर दीडशे वर्षे मागे जाऊ शकते. त्यातही मुद्राक्षरकला म्हणून तिचा विकास गेल्या पंचवीस वर्षांमधला आहे. मधल्या विकासाच्या पायऱ्या गाळून मध्ययुगातून एकदम एकविसाव्या शतकात येताना जी अवस्था होईल, तीच आपली झालेली आहे. परिस्थितीच्या रेट्यामुळे जेव्हा समाज बदलतो, तेव्हा होणाऱ्या विकासाची दिशा ही गोंधळाची, सांधेजोड व्हावी, तशी असते. देवनागरी मुद्राक्षरकलेच्या बाबतीतही थोडे-फार असेच झाले आहे.

देवनागरी अक्षरवळणे तयार करताना सुलेखनशैलीचा जसा प्रभाव पडला, तसाच रोमन मुद्राक्षरांचा, वळणांचा प्रभावही मोठा होता. विशेषतः, मांडणीसाठी (डिस्प्ले)

असलेल्या रोमन अक्षरवळणांची, मुख्यतः जाहिरातकलेसाठी नक्कल करण्यात आली. जाहिरातक्षेत्रातल्या मांडणीकारांनी गरजेनुसार आपल्याला हवी तशी अक्षरवळणे बनविली. त्यांचा उद्देश मुख्यतः मूळ इंग्रजी जाहिरातीतल्या मुद्राक्षरयोजनेशी मराठी अक्षरांची शैली मिळतीजुळती असावी, एवढाच होता. त्यात शास्त्रीय दृष्टीचा अभाव होता. प्रादेशिक भाषांना दुय्यम स्थान असल्यामुळे जाहिरात कंपन्यांची मराठी शुद्धलेखनाबाबत, सुडौल अक्षरवळणाबाबत असलेली उदासीनता आजही वृत्तपत्रीय जाहिरातींमधून आपल्याला आढळेल.

दुसरीकडे ग्रंथमुद्रणाच्या बाबतीत, विशेषतः मुखपृष्ठांवर सुलेखनशैलीच्या नावाखाली जी अक्षरवळणे आढळतात, ती तर अधिकच चिंताजनक आहेत. सुडौलता, सुवाच्यता, वाचनसुलभता, इत्यादी अंगांचा कसलाही विचार न करता मुखपृष्ठांवरची शीर्षके चितारलेली आढळतात!

मुद्राक्षरवळणांची भाषिक गरज, कलात्मकता आणि तंत्रज्ञानातली निर्दोषता यांचा विचार करून ज्यांनी अक्षरवळणे तयार केली, त्यांचीही परंपरा महाराष्ट्रात आहे. देवनागरीला स्वतःचा असा वेगळा ठसा देण्याचे कार्य या मुद्राक्षरकारांनी, उद्योजकांनी केले. रोमन अक्षरवळणांचे वर्गीकरण केले जाते, त्याप्रमाणे देवनागरीचेही करायचे झाले, तर असे करता येईल :

**१) ओल्ड स्टाईल :** जुन्या हस्तलिखितांमध्ये आढळणारी सुलेखनशैली ही पहिल्यावहिल्या मुद्राक्षरांचा आदर्श होती. या वळणांमध्ये बोरूसारख्या लेखणीने काढलेल्या अक्षरांमुळे उभे-आडवे टाक जाड असतात व वक्र भाग वर व खाली जाड आणि मध्यभागी बारीक असतात. प्रत्येक उभ्या टाकाचे तळरेषेकडचे टोक तिरपे असते. अक्षराच्या उंचीचे मधल्या दोन रेषांनी तीन सारखे भाग केलेले असतात. अक्षरांचे मधले वक्राकार भाग अथवा आडवे टाक या दोन रेषांवर असतात. अ-कार हा देवनागरीचा महत्त्वाचा घटक आहे. क आणि फ मध्ये अ-कार मध्य-दंड म्हणून येतो. ट, ठ, ड या अक्षरांमध्ये तो शीर्ष दंड म्हणून येतो. च, त, य, श या अक्षरांमध्ये तो अंत्य दंड म्हणून येतो. ॐ हे अक्षर सोडून बाकी सर्व अक्षरांवर शिरोरेखा असते. मात्रांच्या वापराने बाराखडी तयार होते. ओल्ड स्टाईल मुद्राक्षरांमध्ये श, ध, भ या अक्षरांना गाठी आढळणार नाहीत. ल अक्षरातला अ-कार शीर्ष दंड म्हणून येतो.

देवनागरी मुद्राक्षरे टॉमस ग्रॅहॅमने प्रथम तयार केली, पण १८६४ मध्ये सुरू झालेल्या निर्णयसागर टाईप फौंड्रीने देवनागरी मुद्राक्षरकलेचा पाया घातला. निर्णयसागरचे जावजी दादाजी यांनी राणोजी रावजी आरू यांच्या साहाय्याने अनेक देवनागरी अक्षरवळणे तयार केली. राणोजी रावजी यांनी तयार केलेली आरू बोल्ड, लाईट प्रायमर, इत्यादी अक्षरवळणे आजही आदर्श मानली जातात. सत्तावीस वर्षांच्या कारकीर्दीत त्यांनी इंग्रजी हेडिंगचे ४०, मराठीचे २० आणि गुजरातीचे १५ अक्षरसंच





अनुक्रमणिका

(फाऊंट्स) तयार केले; आणि १९३ संस्कृत व २२८ मराठी पुस्तके प्रकाशित केली. या काळात मुद्रकांचा कल स्वत:पुरता मुद्राक्षरे पाडण्याकडे होता, आणि मुद्राक्षरकार हे उत्तम कारागीर असले, तरी युरोपातील तांत्रिक प्रगती आणि बदलत्या तंत्रज्ञानाची शास्त्रीय माहिती व त्याचे उपयोजन यांबाबत ते उदासीन होते. या वर्गात पुढील मुद्राक्षरवळणे येतात - पायका, पायका ब्लॅक, ग्रेट प्रायमर, इत्यादी.

**गुणविशेष -**

डिग्री सिस्टिमवर आधारित.

साधी, बाळबोध शैली.

मजकुरासाठी उपयुक्त.

अतिशय बारीक रेषा, अलंकरण आढळत नाही. (ब्लॉक क्र. १ पहा)

**२) ट्रान्झिशनल :** गुजराती टाईप फौंड्रीने कला आणि तंत्रज्ञान यांची उत्तम सांगड घातली. पॉईंट सिस्टिमचा वापर देवनागरीमध्ये प्रथम गुजराती टाईप फौंड्रीने सुरू केला. याशिवाय देवनागरीतील पहिली इटॅलिक (तिरप्या वळणाची) अक्षरे तयार केली. रोमन मुद्राक्षरांप्रमाणे सेरिफ असलेली, तसेच, मांडणी (डिस्प्ले) साठी आवश्यक शेडेड, कंडेन्स्ड, ब्लॅक (बोल्ड) अक्षरवळणे तयार केली. लोकसंग्रह, प्रकाश, मोज टाईप फौंड्रीने तयार केलेली मुद्राक्षरेही या वर्गातच मोडण्यासारखी आहेत.

१९४१ मध्ये लोकसंग्रह प्रेसने सान्सेरिफ रोमनशी मिळतीजुळती २४ पॉईंट मुद्राक्षरे तयार केली. सान्सेरिफ देवनागरीमध्ये उभ्या टाकांचे तळरेषेकडील टोक तिरपे न ठेवता तळरेषेला समांतर असे असते. तसेच वक्राकार भाग सर्व ठिकाणी सारख्याच जाडीचे असतात.

उदा., अनंत, भारत.

विजापुरेंनी तयार केलेली गणेश आणि मोजची विजय अक्षरवळणे ही सुद्धा महत्त्वाची आहेत.

सेरिफ हे देवनागरीच्या बाबतीत बाहेरून लादलेले अलंकरण आहे. कारण एका अक्षराचा दुसऱ्या अक्षराशी संबंध जोडणे, वाचनसुलभता आणणे हा जो सेरिफचा प्रमुख उद्देश, तो देवनागरीच्या शिरोरेखेने साध्य होतो. पण सेरिफमुळे देवनागरी मुद्राक्षरांच्या सौंदर्यात भर पडते, हे नक्की. भीष्म, विष्णु यांसारख्या सेरिफ मुद्राक्षरांमध्ये अक्षरांचे वक्राकार भाग पाहिले, तर असे दिसेल, की ते मध्यभागी बारीक नसून, रोमनप्रमाणे वर व खाली बारीक आणि मध्यभागी जाड आहेत.

साधारणपणे १९५० पर्यंतच्या या मुद्राक्षरवळणांना संधिकालीन (ट्रान्झिशनल) म्हणण्याचे कारण असे, की कला आणि तंत्रकौशल्य यांचा संगम इथे आढळतो. देवनागरीमध्ये शैलीची विविधता आणि लवचिकपणा आणण्याचा प्रयत्न या

अक्षरवळणांमध्ये दिसतो. आजच्या संगणकाच्या युगात जी नवी अक्षरवळणे येत आहेत, त्यांचा पाया ही संधिकालीन अक्षरवळणेच आहेत. विसाव्या शतकाचे पहिले अर्धशतक हा सांस्कृतिक जडणघडणीचा काळ होता. देशाभिमान, नव्या औद्योगिक तंत्रज्ञानप्रधान संस्कृतीची चाहूल यांचा प्रभाव लिपीसुधारणा, मुद्रणक्षेत्रातील प्रगती यांच्यावर या काळात पडलेला होता. तंत्रज्ञानाचा स्वीकार करत असताना स्वभाषा, लिपी यांच्याबाबतीत तडजोड करायची, की सांस्कृतिक अग्रक्रमांनुसार तंत्रज्ञान वाकवायचे, याबद्दल थोडीशी द्विधा मनःस्थिती या काळात होती. म्हणून तिला संधिकालीन कालखंड म्हणायचे.

**गुणविशेष -**

पॉईंट सिस्टिममुळे आलेली सुसूत्रता.

मजकुरासाठी, तसेच, मांडणीसाठी उपयुक्त.

रोमन मुद्राक्षरांशी साम्य. (ब्लॉक क्र. २ पहा.)

चार प्रमुख पद्धतींनी जुळणी केलेला मजकूर (मूळ आकारापेक्षा मोठ्या आकारात) पहिले तीन नमुने बापूराव नाईक यांच्या 'मेकॅनिकल कॉम्पोझिशन इन देवनागरी' या लेखातून घेतलेले आहेत. चौथा नमुना आय् टी आर्च्या नमुन्यावरून (अक्षररचना, ऑगस्ट, १९९०) घेतला आहे. अक्षरवळणांचा डौलदारपणा, सुवाच्यता, तसेच वेलांटी, मात्रा, उकार व शिरोरेखा यांची अलाईनमेंट पाहावी.

**३) मॉडर्न :** एकीकडे धातूच्या मुद्राक्षरनिर्मितीमध्ये निर्दोषता आणि परिपूर्णता आणत असतानाच मोनो, लायनो, फोटोटाइपसेटिंग यांसारख्या नव्या तंत्रज्ञानाचा पाश्चात्त्य जगात विकास होत होता. त्याचे पडसाद आपल्याकडेही उमटत होते. १९३१ मध्ये मामाराव दाते यांनी देवनागरी लिपी मोनोटाइप यंत्रावर बसविली. नव्या जुळणीतंत्राला आणि आधुनिक मुद्रणाला योग्य असा देवनागरी मुद्राक्षरकलेचा पाया तयार करण्याचे काम अहमदाबादच्या नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ डिझाईनने केले. युनिव्हर्स अक्षरवळणे तयार करणारे म्हणून मान्यता मिळालेले प्रख्यात मुद्राक्षरकलाकार ॲड्रियन फ्रुटिगर यांच्या मार्गदर्शनाखाली ही अक्षरवळणे तयार करण्यात आली. १९७० मध्ये मोनोटाइपने या अक्षरवळणांवर आधारित उत्पादन सुरू केले. फोटोटाइपसेटिंग, डी.टी.पी., संगणकाची डिजिटल पद्धत यांचाही उपयोग देवनागरी मुद्राक्षरजुळणीमध्ये होऊ लागला. दहा वर्षांपूर्वी पाश्चात्त्य उद्योजक देवनागरी वळणे विकसित करण्यास अनुत्सुक होते. डी.टी.पी संगणकांनी मात्र देवनागरी जुळणीतंत्राला नवी चालना दिली आणि दोन वर्षांतच फोटोटाइपसेटिंग आणि डी.टी.पी.वर भारतामध्येच पॅकेजेस् तयार होऊ लागली. याचे श्रेय इन्स्टिट्यूट ऑफ टायपोग्राफिकल रिसर्चसारख्या संस्थांना दिले पाहिजे.

आधुनिक मुद्राक्षरांचे साधारणपणे दोन कालखंड पडतात. एक १९३० पासून





अनुक्रमणिका

ते १९८० पर्यंतचा, ज्यामध्ये तंत्रज्ञानास सुलभ अशा लिपीसुधारणेचे प्रयत्न झाले. मोनोपद्धतीचा व लायनोपद्धतीचा वापर वृत्तपत्रांमध्ये सर्रास होऊ लागला. पण आधुनिक जुळणीतंत्राचा स्वीकार करत असताना अक्षरवळणांच्या सुडौलपणात अक्षम्य तडजोड स्वीकारावी लागली. देवनागरीची लायनो अक्षरवळणे धातूच्या अक्षरवळणांपेक्षा कलात्मकदृष्ट्या निश्चितच सुमार प्रतीची होती. डी.टी.पी. आल्यानंतर, १९८० नंतर मात्र हे चित्र बदलले. (ब्लॉक क्र. ३ पहा.)

अक्षरवळणांची कलात्मकता आणि विविधता यांच्यांत लक्षणीय वाढ झाली. आज उपलब्ध असलेली अक्षरवळणे कलात्मकदृष्ट्या–ओल्ड स्टाईल, निर्णयसागरने तयार केलेल्या वळणांपेक्षा अधिक सरस नसली, तरी त्यांच्याइतकी चांगली निश्चितच आहेत. नव्या तंत्रज्ञानामुळे अक्षरांचा रेखीवपणा, शिरारेखेकडची अक्षरांची निर्दोष जुळणी (अलाईनमेंट) शक्य झाली. एकच अक्षरवळण अनेक प्रकारांमध्ये उपलब्ध होऊ लागले.

सुवाच्यतेच्या दृष्टिकोनामधून अक्षररचनेमध्ये केलेले काही बदल असे आहेत. श, ध, भ या अक्षरांना गाठ जुन्या अक्षरवळणांमध्ये नव्हती. ती आधुनिक मुद्राक्षरांमध्ये आहे. ल मध्ये अ-कार शीर्षदंड म्हणून येत असे. आता ल चे पादयुक्त रूप वापरले जाते. म्हणजेच अ-कार हा अंत्यदंड म्हणून येतो. ल च्या पूर्वीच्या रूपात जो समतोल साधला जात असे, तो या नव्या रूपात येत नाही. ध, भ, इत्यादी अक्षरांच्या गाठी देवनागरीच्या कंडेन्स्ड रूपामध्ये तितक्या चांगल्या दिसत नाहीत. ख व र आणि व या सुट्या अक्षरांमधला फरक समजण्यासाठी ख हे अक्षर असे (रचे टोक व ला जोडलेले) असते. (ब्लॉक क्र. ४ पहा.)

**गुणविशेष :**

मजकूर आणि मांडणीसाठी उपयुक्त.

एक्स्ट्रॉ लाईट, लाईट, मीडियम, सेमी-बोल्ड, बोल्ड, तसेच कंडेन्स्ड, एक्स्पान्डेड अशा विविध प्रकारांनी एकच अक्षरवळण वापरता येते.

बहुसंख्य अक्षरवळणे जुन्या अक्षरवळणांवर आधारित.

**४) डेकोरेटिव्ह** : देवनागरी अक्षरवळणांचा विकास दोन पद्धतींनी झाला. जुळणीच्या बदलत्या तंत्रज्ञानाला अनुसरून केलेली मुद्राक्षरे; आणि जाहिरातींसाठी आवश्यक असलेली संकल्पचित्रकारांनी वेळोवळी बनवलेली मुद्राक्षरे.

दुसऱ्या प्रकारची अक्षरवळणे डेकोरेटिव्ह अथवा अलंकरणात्मक म्हणता येतील. मुद्राक्षरांच्या विविधतेच्या अभावामुळे जाहिरात कंपन्यांना देवनागरी अक्षरवळणांमधला मजकूर संकल्पचित्रकाराकडून तयार करवून घ्यावा लागे. आज डी.टी.पीवरील मुद्राक्षरांकडे हे चित्र थोडेसे बदलले आहे, इतकेच. पण त्यामुळे अगदी सुमार अक्षरवळणांपासून ते कलात्मक अक्षरवळणांपर्यंत अनेक चढउतार डेकोरेटिव्ह

अक्षरवळणांमध्ये आढळतात. ज्यांनी या प्रकारच्या अक्षरवळणांवर स्वतःचा वेगळा ठसा उमटवला, त्यांच्यापैकी कमल शेडगे यांचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागेल. सुलेखनशैलीबाबतही अनेक नवे प्रयोग, संशोधन गेल्या काही वर्षांमध्ये झालेले आहे. र. कृ. जोशी, अच्युत पालव सुलेखनशैलीच्या परंपरेला आधुनिक दृष्टिकोनाची जोड देऊन मुद्राक्षरकलेची कलात्मकता आणि उपयुक्तता वाढवत आहेत.

**गुणविशेष :**

रोमन मुद्राक्षरांच्या शैलीचे अनुकरण.

शास्त्रीय दृष्टिकोनापेक्षा उत्स्फूर्ततेवर अधिक भर.

पॉईंट सिस्टिमवर आधारित असतीलच, असे नाही.

(यशोमुद्रा / मार्च १९९२ पृ. १५-१९ वरून पुनर्मुद्रित)

**ई १८, सचदेवनगर, सी ब्लॉक, शहाड (पूर्व) स्कीम नं.२, उल्हासनगर ३,**



---

**घोड्यांबरोबर बोलायची भाषा**

भाषांवरून युरोपमध्ये एक म्हण प्रचलित आहे. तिचा जर्मनीत वापर ज्यानं-त्यानं स्वतःच्या जोखमीवर करावा. ती म्हण अशी, "सुंदर स्त्रियांबरोबर इटालियनमध्ये, मुत्सद्यांबरोबर फ्रेंच भाषेत, देवादिकांबरोबर स्पॅनिशमध्ये आणि घोड्यांबरोबर जर्मन भाषेत बोलायचे असते." स्वरांच्या प्राबल्यामुळे इटालियन भाषा लवचिक बनली आहे, तर कंठ्य उच्चार आणि व्यंजनांची रेलचेल यामुळे जर्मन कानाला खूपच कर्कश वाटते म्हणून ती घोड्यांबरोबर बोलायची!

**(संदर्भ : 'ओअॅसिसच्या शोधात,' ले. फादर फ्रान्सिस दिब्रिटो. पृ. ६४)**



अनुक्रमणिका

**ब्लॉक क्रमांक १**

## देवनागरीचे वर्गीकरण

---

सुलेखन शैली

हृदिनिहितोर्वेदोयेनहृदीत्यस्यात्तस्याप्यन्वयः

---

ओल्ड स्टाईल

ज्ञानेच्छूंना आमची अशी

एक अभिरूप नाट्यदर्शन घडविण्यांत आले.

---

ट्रान्झिशनल

किती गोड, किती सुमधूर, किती

टाईप तैयार करनेमें चाहे

सुदूरवर्ती पर्वत सुगम्य और उसपर

---

मॉडर्न

कलात्मक लेखन व मुद्रण

बहुसंख्यांना न्याय मिळाला !

---

डेकोरेटिव्ह

आपल्या धनाची वृद्धि

पैसे होती दुप्पट

नव्या वर्षासाठी

आभारी आहोत

---





अनुक्रमणिका

ब्लॉक क्रमांक २

Hand set 12 pt.,
two point leaded

महाराष्ट्राच्या भक्तिसंप्रदायात भागवत पंथ, लिंगायत पंथ, वारकरी पंथ, महानुभावी पंथ इत्यादी पंथ निर्माण झाले. त्या सर्वांत जुना नाथपंथ आहे.

Monotype 12 on 14 Pt.

महाराष्ट्राच्या भक्तिसंप्रदायात भागवत पंथ, लिंगायत पंथ, वारकरी पंथ, महानु-भावी पंथ इत्यादी पंथ निर्माण झाले. त्या सर्वांत जुना नाथपंथ आहे. या

Linotype 12 on 13 Pt.

महाराष्ट्राच्या भक्तिसंप्रदायात भागवत पंथ, लिंगायत पंथ, वारकरी पंथ, महानु-भावी पंथ इत्यादी पंथ निर्माण झाले. त्या सर्वांत जुना नाथपंथ आहे. या

'मयूर' एक्स्ट्रा लाईट १३/१५ पॉइंट

जाहिरात आणि प्रचाराच्या क्षेत्रात भाषेच्या
जगातल्या बहुतेक देशांनी केला आहे.
यांचा जाहिरातीच्या सौंदर्यावर मोठा प्रभाव
मुद्रणात कलात्मक अक्षरांच्या बाबतीत फार

ब्लॉक क्रमांक ३

शुभेच्छा

शुभेच्छा

रोमन शैली व देवनागरी शैलीतील अक्षरांची जाड व बारीक वळणे

# क ल श

अ - कार : क - मध्यदंड, ल - शीर्ष दंड, श - अंत्य दंड

ब्लॉक क्रमांक ४

एकच अक्षरवळण विविध प्रकारांमध्ये

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| Yogesh | Ex. Light | Light | Med-ium | Sem. Bold | Bold |
| १ | च | च | च | च | च |



अनुक्रमणिका







दखलपात्र

# चित्पावनी भाषा : एक चिकित्सा

**श्रीराम गो. बर्वे**

प्रत्येक भाषेला काही उपभाषा असतात. मूळ भाषेतील शब्दांचे अपभ्रंश, वाक्यरचनेतील बदल बोलण्याच्या पद्धतीतले फरक, भौगोलिक वा व्यावसायिक पार्श्वभूमी अशा अनेक कारणांमुळे अशा उपभाषा निर्माण होतात. आपल्या मराठी भाषेतदेखील अशा अनेक उपभाषा दिसून येतील. वऱ्हाडी भाषा, नागपुरी बोली, कोकणी, मालवणी, इत्यादी ठळक भेद तर आहेतच, शिवाय पुणेरी मराठी, कोल्हापुरी मराठी, बेळगावी मराठी असे अनेक प्रकारही दिसून येतात. अर्थात साधारणपणे प्रत्येक वीस-पंचवीस किलोमीटर्सच्या परिसरात भाषेचे स्वरूप थोडे-फार बदलतच असते. त्यामुळे अशा तऱ्हेने निर्माण झालेल्या सर्वच भेदांना वेगळे नाव देणे योग्य ठरणार नाही. (तसे पाहिल्यास बेळगावात, गावातील मराठी आणि टिळकवाडीतील मराठी यांच्यांतही फरक आहे.) पण भाषेचे स्वरूप बदलत जाऊन नागरी भाषा बोलणाऱ्या माणसाला ती कळणेही जेव्हा अवघड जाते, तेव्हा मात्र त्या बोलीभाषेला मूळ भाषेची उपभाषा म्हणणे वावगे ठरणार नाही. उदा., वऱ्हाडी, मालवणी, इ. अशा उपभाषा भाषेच्या समृद्धीच्या दृष्टीनेच नव्हे, तर नवीन भाषा निर्माण होण्याच्या दृष्टीनेही महत्त्वाच्या असतात. आजच्या मराठी, हिंदी, गुजराती, बंगाली, इ. भाषा मूळ संस्कृत भाषेत असेच बदल होत जाऊन निर्माण झाल्या आहेत. या भाषांच्या आजच्या समृद्धीकडे पाहता वरील विधान पटावे. तात्पर्य, बोलीभाषा किंवा उपभाषांकडे दुर्लक्ष न करता त्यांनाही महत्त्वाचे स्थान देणे आवश्यक आहे.

चित्पावनी ही अशीच एक बोलीभाषा. चित्पावन ब्राह्मणांची आपापसांत बोलायची भाषा म्हणजे चित्पावनी. ही भाषा मूळची कुठली? ती कशी निर्माण झाली? वगैरे प्रश्नांची उत्तरे देणे कठीण आहे. मूलतः चित्पावन ब्राह्मण नक्की कुठले? याविषयीदेखील मतभेद आहेत. चित्पावनांच्या उगमाविषयी अनेक पौराणिक कथा आहेत. पण ऐतिहासिकदृष्ट्या ते इराणच्या बाजूने येऊन कोकणात स्थायिक झाले असावेत व नंतर स्थानिक लोकांत आणि त्यांच्यांत झालेल्या रोटीबेटी व्यवहारामुळे त्यांना ब्राह्मण करून घेणे (त्यांची बुद्धिमत्ता पाहून) भाग पडले असावे, असे एक मत

आहे. चित्पावनही द्रविड ब्राह्मणांचीच एक शाखा होय, असेही एक मत आहे. पण चित्पावनी भाषेचे सध्याचे स्वरूप पाहता, ही मराठी, कोकणी वगैरे भाषांची सख्खी बहीण आहे, हे कोणीही सांगू शकेल.

सुमारे दोनशे वर्षांपूर्वी सध्याच्या रत्नागिरी, सिंधुदुर्ग, गोवा, दक्षिण कन्नड, शिमोगा, इ. जिल्ह्यांतील सर्व चित्पावन लोक चित्पावनी बोलत. (अर्थात त्यात स्थलपरत्वे काही भेद असण्याची शक्यता आहे.) सध्या ही भाषा रत्नागिरीतून पूर्ण व सिंधुदुर्गातून जवळजवळ संपूर्ण नामशेष झालेली आहे. गोव्यात मात्र अजून चित्पावनी बोलली जाते. तसेच, कर्नाटकातील शृंगेरी, कारकळ, शिमोगा, यल्लापूर, इ. भागांतले लोकही चित्पावनी बोलतात. पण गोव्यातल्या चित्पावनीत अनेक मराठी, कोकणी व पोर्तुगीज शब्द आल्याने व कर्नाटकातल्या चित्पावनीत अनेक कानडी शब्द मिसळल्याने या दोन्ही भाषांत कमालीचा फरक पडला आहे. त्यामुळे शृंगेरीचा माणूस चित्पावनी बोलू लागला, की गोव्याच्या माणसाला ती 'चित्पावनी आहे' या पलीकडे काहीही समजत नाही. गोव्यात आणि सिंधुदुर्ग भागात बोलली जाणारी चित्पावनी मात्र मराठी माणसाला थोड्या प्रयत्नांनी समजते. नागरी मराठी व चित्पावनीतील काही ठळक भेद असे : चित्पावनीत,

१) स्वरांपैकी 'ए' चा उच्चार अ व ए यांच्या मधला (ऍ असा) आणि 'ओ' चा उच्चार ओ व अ यांच्यामधला (ऑ असा) होतो.

२) नातेसंबंध दर्शवणारे शब्द शकारान्त असतात. उदा., आईश, बापूश, भैणीश, इ.

३) मराठीत आकारांत असलेले शब्द ओकारांत, तर मराठीत एकारांत असलेले शब्द आकारांत होतात. उदा., घोडा मोठा झाला. -घोडो मोठो झालो : मी केळे खाल्ले - में केळां खाल्ला.

४) मराठीत वकारांत असलेले धातू यकारांत होतात. उदा., जेव-जेय, ठेव-ठेय.

५) 'ऊन' हा विभक्तिप्रत्यय वनी असा होतो. उदा., मी जाऊन आलो. - मे जावनी आयलो.

६) ईकारांत स्त्रीलिंगी शब्दांचे अनेकवचन ओकारान्त होते. उदा., शेळी - शेळयो.

क्रियापदांची रूपे, विभक्तिप्रत्यय, इ. गोष्टी जवळजवळ मराठीसारख्याच असल्या तरी त्यांत थोडे-फार फेरफार केले गेले आहेत. शब्दांच्या स्वरूपातही बरेच फेरफार केले आहेत. उदा., कुठला - केंचो, काय-किंता, इथे-एठा, तिथे-त्याहा, मी-मे, केव्हा-कय, आहे-से, आहेत-सत, नको-नाका, म्हणून- म्हणी अशी कित्येक उदाहरणे देता येतील. क्रियापदाचे स्वरूप कळावे, म्हणून 'जाणे' हे क्रियापद वर्तमानकाळात चालवून दाखवले आहे- मे जांसां, आम्ही जांसो, तू जासस, तुम्ही जांसां, तो जासे, ती जासे, तां जासे; ते जासत, त्या जासत, ती जासत.

तशी चित्पावनी शिकायला अवघड नाही. पण दुर्दैवाने तशा दृष्टीने कोणतेही पुस्तक उपलब्ध नाही (निदान माझ्या माहितीनुसार) उदाहरणादाखल म्हणून चित्पावनीतला एक परिच्छेद दिला आहे. थोड्या प्रयत्नाने तो समजेल.

***"हेत्री सायबान स्वतः एक फाटकी विजार गुडघेपर्यंत गुंडाळनी घेतली सली. शर्टबी मळकोच सलो. शर्टचो पुढचो भाग विजारीत खोचलो सलो आणि मागचो भाग पदरावरी लोंबत सलो. साएब शाप ओचीन दिसत सलो. एका डबेत पांढरो रंग घेवनी सायब खोली रंगवीत सलो आन् तेची बाईल कमरेभोवती फडका गुंडाळनी तेला मदत करीत सली. नऊ वर्षाचो एक पोरगो, जमिनीवर रंग पडलो रे पडलो की मोठ्या आनंदान तो पुशील सलो. माकतेन माकतेन रंग सांडे हवो असा तेला मनापाष्णी वाटत सला."***

वर सांगितल्याप्रमाणे चित्पावनी भाषा सध्या फक्त गोव्यात आणि कर्नाटकाच्या काही भागांतच अस्तित्वात आहे व तिथेही हळूहळू ती नष्ट होत चालली आहे. आता लोक सुशिक्षित, सुसंस्कृत झाले आहेत. त्यामुळे त्यांना चित्पावनी बोलण्यात काही कमीपणा वाटतो का? ही विचार करण्यासारखी गोष्ट. गोव्यात अजूनही जवळजवळ प्रत्येक चित्पावनाला चित्पावनी येते. पण सर्वच लोक चित्पावनी बोलतात, असे नाही. बहुसंख्य सुशिक्षित लोक मराठीच बोलतात. घरात चित्पावनी बोलल्यास मुलांना लवकर मराठी येणार नाही व त्यामुळे त्यांचे शालेय शिक्षणात नुकसान होईल, असे वाटून पुष्कळ पालक घरात मराठी बोलतात. परंतु असा विचार करताना ते स्वतःचेच उदाहरण विसरतात. त्यांच्या लहानपणी घरात पूर्णपणे चित्पावनीच बोलली जायची. काही ठिकाणी तर मराठीचा लवलेशही नव्हता. त्यांना मराठीतून शिकताना कितपत अडचण आली? चित्पावनी बोलणारे मूल वर्षभरात मराठीशी अगदी सहज जुळवून घेऊ शकते. हे पालकांनी लक्षात घ्यायला हवे. पालकांनीच चित्पावनी बोलण्याचे सोडले, तर ती मुलांना येणार कशी आणि पुढच्या पिढ्यांना समजणार कशी?

जोपर्यंत चित्पावनी भाषा वाचवण्याचे जाणीवपूर्वक प्रयत्न होत नाहीत, तोपर्यंत ती टिकून राहणे अशक्य आहे. परिस्थिती अशीच राहिली, तर येत्या साठ-सत्तर वर्षांतच चित्पावनी भाषा नष्ट होऊन जाईल. आज ठिकठिकाणी चित्पावन संघ स्थापन झालेले आहेत. त्यांनी ही भाषा वाचवण्यासाठी प्रयत्न करणे आवश्यक आहे. चित्पावनी भाषेविषयी इत्थंभूत माहिती असलेल्या व्यक्तींकडून (असे फार थोडे लोक सध्या शिल्लक आहेत.) पुस्तके लिहवून घेणे, चित्पावनीचा प्रचार व प्रसार करणे, इत्यादी गोष्टींचा या कार्यक्रमात अंतर्भाव होऊ शकतो. या बाबतीत कोकणीचा आदर्श बाळगायला हरकत नाही. कोकणी लोकांनीही बोली ते भाषा असा आपला प्रवास करून कोकणीत साहित्यनिर्मितीही सुरू केली आहे.

तुम्ही म्हणाल, की सध्या मराठीचीच अवस्था, 'वॉऽट साहित्य संमेलन, मॅन? त्या बोअरिंग पोएम्स लिसन करण्यापेक्षा व्हिडीओ बघू या, चल!' अशी झालीय्. तिथं





अनुक्रमणिका

कुठली चित्पावनी आणि कुठली कोकणी ? तुमचा मुद्दा बरोबर आहे. पण हे कितपत योग्य आहे ? पाश्चात्त्य संस्कृतीचे अंधानुकरण करायच्या धावपळीत आम्ही आमचे स्वत:चे असे पुष्कळ गमावीत आहोत. हल्ली मराठी जरी लोकांना नीट लिहिता वाचता येत नसली, तरी फ्रेंच, जर्मन मोठ्या प्रेमानं शिकतात. त्यापेक्षा आपल्या मूळ भाषा शिकणे जास्त श्रेयस्कर नव्हे का ? भाषेमुळे संस्कृती टिकते, असे म्हणतात. संस्कृतीचे राहू दे. ती फार मोठी गोष्ट आहे. निदान आपली भाषा टिकवून धरणे आपल्या हातांत आहे, ते तरी आपण केले पाहिजे.

**(संदर्भ : दै. तरुण भारत, बेळगाव, रविवार, दि. ३-९-१९९५)**



---

**पांडव आणि जर्मन भाषा**

युरोपमध्ये इटालियन भाषा आणि स्त्रिया कमालीच्या लाघवीपणाबद्दल प्रसिद्ध आहेत. या भाषेत स्वरांचं प्राबल्य आहे. कमनीय अशा स्वरसुंदरीच्या कटीवर हात ठेवून इथली व्यंजनं प्रवास करीत असतात. इथल्या पुरुषाप्रमाणं तीही रसिक, रंगेल म्हणावी लागतील. जर्मन भाषेचं उलट आहे. त्या राकट आणि रानवट भाषेतील व्यंजनं पांडवांसारखीच! एखादी स्वरांची द्रौपदी त्यांना पुरेशी असते. उदाहरणार्थ 'मार्केट' हा शब्द घ्या. इटालियनमध्ये त्याचा होतो. 'MERCATO' तर जर्मनीमध्ये 'MARKT'

**(संदर्भ : 'ओॲसिसच्या शोधात.' ले. फादर फ्रान्सिस दिब्रिटो पृ. ६४)**

# प्रस्तावना : सिंधी-मराठी कोशाची

रत्नाकर बापूराव मंचरकर

प्रा. लछमन परसराम हर्दवाणी मूळचे सिंधभूमीतील सिंधीभाषक असले, तरी महाराष्ट्राच्या जनजीवनाशी एकरूप झालेले आहेत. साहजिकच सिंधी, हिंदी, मराठी, उर्दू, इंग्रजी अशा अनेक भाषांवर त्यांचे सारखेच प्रभुत्व आहे. भाषा आणि वाङ्मय यांच्या समृद्धीसाठी आणि सिंधी-मराठी भाषकांना जोडण्यासाठी त्यांनी आपली प्रज्ञा आणि प्रतिभा परिश्रमपूर्वक निष्ठेने वापरली आहे. कुशल नाट्यदिग्दर्शक आणि अभिनेते, हिंदीचे व्यासंगी प्राध्यापक, सिंधी भाषेच्या उत्कर्षासाठी संस्थात्मक कार्य करणारे विधायक वृत्तीचे कार्यकर्ते, सिद्धहस्त भाषांतरकार आणि द्वैभाषिक कोशकार अशा अनेक पैलूंनी त्यांचे व्यक्तिमत्त्व संपन्न आहे. साहित्य अकादमीने पारितोषिक देऊन त्यांच्या या बहुभाषिक साहित्यसेवेचा यथोचित गौरव केलेला आहे. तसा सन्मान पुन्हा लाभावा, अशा तोलामोलाचा 'सिंधी-मराठी शब्दकोश' घेऊन ते आता पुन्हा आपल्यासमोर येत आहेत.

'शब्दकोश' (Dictionary) आणि 'विश्वकोश' (Encyclopaedia) असे दोन्ही प्रकार 'कोश' या संज्ञेने सूचित होतात. ज्ञानाचे संकलन, परिगणन, वर्गीकरण आणि व्यवस्थापन यांच्या पद्धतशीर संग्रह कोशात केलेला असतो. त्यात संकलनाबरोबर नवशोधनही समाविष्ट असतते. ज्ञानधन नव्या पिढीपर्यंत पोहोचविण्याची तळमळ त्यामागे असते. असे कोशच राष्ट्राच्या ज्ञानसाधनेला बैसका प्राप्त करून देतात.

१९६४ मध्ये भारतीय भाषांमधील कोशवाङ्मयाची एक पाहणी करण्यात आली. तीत बृहत् विश्वकोशनिर्मितीत बंगालीनंतर (१७) मराठीचा (१५) क्रमांक लागतो. एकभाषिक शब्दकोशांबाबत मात्र हिंदी (१३१) सर्वांत आघाडीवर असून त्यानंतर संस्कृत, प्राकृत, तामीळ, बंगाली, उर्दू, गुजराती या भाषांचा क्रम लागतो. या संदर्भात मराठीचा (४०) क्रम भारतात सातवा आहे. भारतात पुष्कळच कोशकार्य झालेले असले, तरीही अनेक अंगांनी निरनिराळ्या प्रकारचे कोश निर्माण होण्याची गरज जाणवते. आजच्या गतिमान युगात कोशांची उपयुक्तता आता सामान्य वाचकालाही पटू लागली आहे.

यथार्थ आकलनासाठी शब्दकोश कसे आणि किती उपयुक्त ठरतात, हा आपणां सर्वांच्या अनुभवाचा भाग आहे. शब्दकोश म्हणजे निव्वळ शब्दांचा संग्रह नसतो. त्यात

शब्दांचे अर्थही देण्याचा प्रयत्न असतो. परिभाषा, व्युत्पत्ती, समानार्थी, विरुद्धार्थी, म्हणी-वाक्प्रचार, ग्रंथ किंवा लेखक यांच्याशी संबंधित असे विशिष्ट शब्दकोश असू शकतात. अशी कोणतीही मर्यादा न स्वीकारता भाषेतील समग्र शब्दभांडाराला कवेत घेणारे सर्वसमावेशक शब्दकोशही असतात. ते एकभाषिक, द्वैभाषिक किंवा बहुभाषिक असू शकतात.

केवळ शब्दांच्या याद्यांपासून ते समावेशक आणि पद्धतशीर अशा सार्थ शब्दकोशापर्यंतचे शब्दकोश मराठीत अगदी यादवकाळापासून आढळतात. फार्सी ही राज्यभाषा असल्याने मध्ययुगीन मराठीतही फार्सी-मराठीसारखे द्वैभाषिक कोश निर्माण झालेले दिसतात. अशा तऱ्हेचे मध्ययुगीन कोशवाङ्मय सिंधीमध्ये उपलब्ध नाही. धर्मप्रसार, राज्यशासनाच्या प्रशासकीय गरजा आणि नवीन शिक्षणाचा भाग म्हणून अव्वल इंग्रजी काळात कोशरचनेला चालना मिळाली. त्यामुळे एकोणिसाव्या शतकात मराठीप्रमाणे सिंधीतही शब्दकोश निर्माण झालेले दिसतात. त्यामागे ज्ञानाविषयीची तहान होती, तशी राष्ट्रीय उन्नतीची तळमळही होती.

भारताचे बहुभाषिक पर्यावरण लक्षात घेतले, तर द्वैभाषिक किंवा बहुभाषिक कोशांची गरज अधिक जाणवते. प्रशासकीय व्यवहार, एकात्मतेची आच आणि भाषांतराच्या गरजा यांमुळे स्वातंत्र्योत्तर कालखंडात द्वैभाषिक कोशरचनेला गती मिळाली.

असे द्वैभाषिक कोश हिंदीमध्ये अधिक आहेत. वि.न.नरवणे यांचा 'भारतीय व्यवहारकोश' (१९६१) हा एक व्यापक, समावेशक असा बृहत्प्रकल्प आहे. हिंदी शब्द-वाक्प्रचारांना हा कोश सिंधी-मराठी- इंग्रजीसह आणखी बारा भारतीय भाषांचे पर्याय देतो. मराठीमध्ये तुलनेने द्वैभाषिक कोश कमी आहेत. व्यापारामुळे भिन्न भाषकांच्या सहवासात येणाऱ्या सिंधी माणसांच्या भाषिक गरजा बहुविध आहेत. त्या भागविण्याचा एक मार्ग म्हणून द्वैभाषिक कोशांकडे पाहता येईल. कॅप्टन स्टॅक (१८५५) पासून परमानंद मेवाराम (१९१० व १९३३) यांच्यापर्यंतच्या कोशकारांनी सिंधी-इंग्लिश शब्दकोशांची परिश्रमपूर्वक निर्मिती केली. पाकिस्तानात अनेक प्रकारचे सिंधी कोश सिद्ध होत आहेत. त्यात 'सिंधी-लुगत' सारखा पंचखंडात्मक कोश आणि 'सिंधी-उर्दू-लुगत्' सारखा द्वैभाषिक कोश हे महत्त्वाचे प्रयत्न आहेत. स्वातंत्र्योत्तर कालखंडात हिंदी-इंग्लिश-सिंधी, हिंदी-सिंधी, मराठी-सिंधी आणि आता सिंधी-मराठी अशा कोशांची निर्मिती झालेली दिसते.

ह्या दिशेने पुष्कळसे कार्य झालेले असले, तरी आपल्या गरजा भागविण्यास ते पुरेसे नाही. मुळात कोशरचनेचे शास्त्र अवगत असणारे अभ्यासक दुर्मीळ आहेत. आपल्या समाजातील वाङ्मयव्यवहाराचे अर्थशास्त्र जातिवंत ज्ञानप्रेरणांना मारक ठरणारे आहे. अशा कामाला स्वास्थ्य, सवड, दीर्घकालीन चिकाटी आणि अखंड निदिध्यास लागतो. कोशकार्याची व्यापकता, त्यासाठी करावे लागणारे अफाट परिश्रम,

त्यातील सातत्य, त्यासाठी लागणारा दीर्घ काळ, त्याच्या आर्थिक गरजा लक्षात घेतल्या तर कोशरचनेतील बिकटपणाची सहज जाणीव होईल.

अशा प्रतिकूल परिस्थितीत प्रा. लछमन हर्दवाणी यांनी सिंधी-मराठी द्वैभाषिक कोशरचनेवर लक्ष केंद्रित केले. पंचवीस हजारांहून अधिक मराठी शब्दांचा देवनागरी सिंधीत अर्थ देणारा 'मराठी-सिंधी कोश' (१९९२) त्यांनी प्रथम सिद्ध केला आणि आता वीस हजारांहून अधिक सिंधी शब्दांचा मराठी अर्थ देणारा 'सिंधी-मराठी कोश' ते आपल्या हाती ठेवीत आहेत.

कोशकार्य हे शिवधनुष्य आहे, हे जाणूनही प्रा. लछमन हर्दवाणी यांनी एक नाही, तर दोन कोशांची निर्मिती केली आणि पासष्ट वर्षांनंतर श्री. परमानंद मेवाराम यांच्या पंक्तीत बसण्याचा मान मिळविला, हे भूषणास्पद आणि अभिनंदनीय आहे.

सिंधी भाषा आणि भूमी यांच्या पार्श्वभूमीवर त्यांच्या शब्दकोशाची वैशिष्ट्ये ठळकपणे जाणवतात.

सिंध-भारतीय उपखंडाच्या पश्चिमेचे टोक. सिंधु नदीच्या मुखाकडील खोऱ्याचा हा भाग. सिंध ही सिंधु नदीची देणगी आहे. सिंधी लोकांच्या श्रद्धेचे आणि प्रेमाचे परमोच्च निधान सिंधु आहे. सिंधूच्या बदलणाऱ्या फेसाळ प्रवाहाबरोबर सिंधची संस्कृती आणि साहित्य बदलत गेलेले दिसते.

सरहद्दीवर असल्यामुळे सिंध नेहमीच आक्रमकांच्या टाचांखाली तुडविला गेला आहे. आर्य, द्रविड, अतिप्राचीन आदिवासी, सिथियन्स, ग्रीक, अरब, यूरोपियन, इराणी, तुराणी, मोगल व पठाण या सर्वांनी सिंधमधून प्रवास केलेला आहे. त्यांचा चिरस्थायी नसला, तरी काही ना काही ठसा सिंधी संस्कृतीवर उमटलेला आहे. ब्राह्मणी आणि बौद्ध, हिंदू आणि मुस्लिम यांचा समन्वित जीवनप्रवाह सिंधमधून वाहत गेलेला आहे.

सिंधची परंपरा दर्यावर्दी व्यापाऱ्यांची आहे. आजही अशा व्यापाऱ्यांच्या शाखा सुसंस्कृत जगाच्या बहुतेक भागांत पसरलेल्या आहेत.

इतिहास, भूगोल आणि व्यावसायिक जीवनपद्धती यांमुळे सिंधी लोकांचा विभिन्न संस्कृतींशी सातत्याने संबंध आला. आपली वेशभूषा, सवयी, विचारसरणी इतरांबरोबर जुळवून घेण्याचा सिंधी लोकांचा लवचिकपणा इतर भारतीयांमध्ये क्वचितच आढळतो.

सिंधी लोकांजवळ विशाल दृष्टिकोन आणि धार्मिक सहिष्णुता आहे. विविधतेमागील एकतेवर त्यांची श्रद्धा आहे. संयम आणि प्रेम या मार्गांनी त्या मूलभूत चैतन्याशी नाते जोडता येते, यावर त्यांचा विश्वास आहे. भारतीय आणि मुस्लिम धर्मचिंतनाचा समन्वित परिपाक सिंधी सूफी तत्त्वज्ञानात आढळतो. या मूळ कंदातून सिंधी साहित्याचा जन्म झाला आहे.

मुअन-जो-दडोची (मोहेंजोदारोची) अतिप्राचीन (इ.स.पू. ३२४० ते २७५०

प्रगल्भ संस्कृती जेथे बहरली, त्या सिंधभूमीत सोळाव्या शतकापूर्वीचे सिंधी साहित्य फारसे उपलब्ध होत नाही.

फाळणीनंतर सिंध प्रांत पूर्व पाकिस्तानात विलीन झाला. सिंध आणि सिंधी यांच्या कपाळी उपेक्षा आली. आता पुन्हा एकदा सिंधी भाषेला एक प्रमुख भारतीय भाषा म्हणून सन्मानाचे स्थान लाभत आहे.

सिंधी ही संस्कृत-प्राकृत परंपरेतील आर्य-भारतीय भाषा आहे. मराठी, हिंदी, पंजाबी, बंगाली या भाषांपेक्षा जुन्या प्राकृताशी विशेषतः व्राचड अपभ्रंशांशी तिचे जवळचे नाते आहे. या भाषांची पूर्वरूपे, ध्वनी आणि व्याकरणिक वैशिष्ट्ये सिंधीने इतर कोणत्याही भाषांपेक्षा अधिक जपली आहेत. आविष्करणातील सफाई आणि भाषेच्या घडणीतील आंतरिक संगती यादृष्टीने सिंधीची व्याकरणिक चौकट पक्की आहे.

सिंधीच्या लिपीत विविधता आहे. लहंदा, नागरी, गुरुमुखी या लिप्यांचा वापर जुन्या सिंधी वाङ्मयात दिसतो. सव्वाशे-दीडशे वर्षांपूर्वी सिंधच्या ब्रिटिश राज्यकर्त्यांनी अरबी सिंधी लिपी सिद्ध केली आणि तिचा वापर सुरू केला.

सिंधीचा शब्दसंग्रह निरनिराळ्या स्रोतांतून आलेला आहे. सिंधीमधील जवळजवळ चारपंचमांश शब्द संस्कृतमधून स्वीकारलेले आहेत; असे श्री. झमटमल तारूमल, डॉ. एच्. एम्. गुरुबक्षाणी, डॉ. अब्दुल करीम संदेली या संशोधकांनी दाखविलेले आहे. द्रविडी भाषांतील शब्दही सिंधीत सापडतात. नेहमीच्या संपर्कामुळे अरबी- फार्सी शब्दांनीही सिंधीत भर घातली आहे.

भाषेचा रूपविधी मर्यादित असला, तरी तिचा रूपनिधी विशाल असतो. कोणतीही भाषा ती बोलणाऱ्या लोकांच्या गरजा भागविण्यासाठी शब्द घडवीत असते. 'उंट' या शब्दासाठी सिंधीत पंधरा शब्द आहेत. कोणत्याही भारतीय भाषेत एवढे शब्द सापडणार नाहीत. शरीरावयव, विविध प्राणी आणि वनस्पती यांचे वर्णन करण्यासाठी सिंधीत विपुल शब्द आहेत. पिकांच्या परिभाषेबाबत ती विशेष समृद्ध आहे. गवत आणि मासळीविषयक शब्दांचीही तीच स्थिती आहे. कौटुंबिक नातेसंबंध व्यक्त करण्यासाठी इतर भाषांत एकाहून अधिक शब्द वापरावे लागतात. पण ते एकाच शब्दातून व्यक्त करण्यात सिंधी शब्दसंग्रहाची विशिष्टता आहे. आधुनिक युगाच्या गरजा भागविण्याइतकी सिंधी समृद्ध आहे.

इंग्रजी-सिंधी आणि सिंधी-इंग्रजी असे दोन कोश सिद्ध करून कै. परमानंद मेवाराम यांनी सिंधीचा सर्वसमावेशक शब्दकोश सिद्ध करण्याचा साहसी प्रयत्न केला. हा उपक्रम महत्त्वाचा असला, तरी नव्या काळाच्या गरजा भागविण्यासाठी नव्या उपक्रमांची नेहमीच गरज असते. कोशकार्य ही सतत चालणारी, विकासशील आणि गतिमान प्रक्रिया आहे. बदलत्या काळाबरोबर जीवनही बदलते. त्याची वेगवेगळी क्षेत्रे विकसित होतात. व्यापार-व्यवसायाची वाढ होते. अशा वेळी धर्म, विज्ञान, कला,





अनुक्रमणिका

उद्योग, युद्ध अशा निरनिराळ्या क्षेत्रांतील शब्दांच्या संकलनाची गरज वाढत जाते. जुने वाङ्मय नव्याने उजेडात येते. नव्या वाङ्मयाच्या निर्मितीला वेग येतो. विविध परिसरांतील बोलींचे शब्दधन, नवज्ञानासाठी आवश्यक अशी परिभाषा या सर्वांचे समावेशन करणाऱ्या महाशब्दकोशाची गरज जाणवू लागते. प्रा. लछमन हर्दवाणी या दिशेने पावले टाकू पाहत आहेत. 'मराठी-सिंधी शब्दकोश' (१९९२) आणि 'सिंधी-मराठी शब्दकोश' (१९९५) हे त्यांचे दोन्ही कोश असा धिंवसा बाळगतात.

कै. परमानंद मेवाराम यांच्यानंतर एकाच व्यक्तीने दोन-दोन कोश तयार करण्याची, जवळजवळ पासष्ट वर्षांनंतर घडलेली ही ऐतिहासिक घटना आहे. अनेक अंगांनी या कोशाचे प्राथम्य– पहिलेपण– लक्षात घेता येते.

अरबी-सिंधी आणि देवनागरी-सिंधी अशा दोन्ही लिप्यांचा एकत्रित वापर करणारा हा पहिलाच कोश आहे. त्यामुळे त्याची उपयुक्तता वाढलेली आहे.

सिंधी भाषेची मराठीसारख्या दुसऱ्या भारतीय भाषेशी रुजवात करून देणाराही हा पहिलाच कोश आहे. वीस हजार सिंधी शब्द- वाक्प्रचारांचे मराठीत अर्थ देणारा हा पहिला कोश आहे. सिंधी आणि मराठी या दोन्हीही आर्य-भारतीय कुळातील भाषा आहेत. जुन्या मराठीतील उकारान्त शब्दांचे बाहुल्य सिंधीत आजही दिसते. जसे, सागरु, गणेशु अशी रूपे सिंधीत सर्रास दिसतात. मराठीप्रमाणे सिंधीतही अनेक क्रियापदे 'ण' कारान्त आहेत. 'आहे' सारखे क्रियापद फक्त सिंधी व मराठी याच भाषांमध्ये दिसते. ते इतर भाषांमध्ये आढळत नाही. सिंधी आणि मराठी यांतील समानार्थक अशा जवळजवळ पाच हजार शब्दांची नोंद या कोशात आहे. सिंधी-मराठी या भाषांमधील आश्चर्यकारक साम्यावर या कोशाने प्रथमच प्रकाश टाकलेला आहे.

आपले लोक, आपली भाषा आणि आपले राष्ट्र यांच्यावरील प्रेमाने हर्दवाणींसारखा कोशकार एका व्रतस्थ वृत्तीने स्वतःला अशा कामात झोकून देतो. झटपट प्रसिद्धी आणि हवा तेवढा पैसा या दोन्हींपासून दूर राहून तो आपल्या कामावरील श्रद्धेने पण एकाकीपणे कष्ट उपशीत राहतो. कोश हा असा अखंड चालणारा ज्ञानयज्ञ आहे. अशा कोशांनी राष्ट्राच्या बौद्धिकतेला कणा प्राप्त होतो.

प्रा. लछमन हर्दवाणी यांचा 'सिंधी-मराठी शब्दकोश' दोन भाषा, दोन प्रांत आणि दोन समाज यांना जोडणारा आहे. भाषांतराला उपयुक्त साधन पुरविणारा कोश आहे. त्यामुळे अशा कोशकर्त्याविषयीची कृतज्ञता हा आपल्या सांस्कृतिक संवेदनशीलतेचा भाग ठरतो. कोशकाराने परिश्रमाने गोळा केलेले, पण उघड्यावर मांडलेले हे धन वाचकांनी दोन्ही हातांनी भरभरून घ्यावे. लोकांचे शब्दवैभव समृद्ध होण्यातच कोशकर्त्याच्या निरलस परिश्रमांचे साफल्य आहे.

**रा. ब. ना. बोरावके महाविद्यालय, श्रीरामपूर (जि. अहमदनगर)**



ज्याची त्याची प्रचीती

# भाषेच्या अध्यापनातील काही प्रयोग

मनोहर राईलकर

(प्रा. मनोहर राईलकर स.प. महाविद्यालयात गणिताचे प्राध्यापक होते, हे बहुतेक वाचकांना माहीत असेल. पण स.प. महाविद्यालयातील नेहमीच्या अध्यापनाच्या कामाव्यतिरिक्त शि. प्र. मंडळीने त्यांच्याकडे नू.म.वि. मराठी शाळा व शिशुशाळा ह्या दोन संस्थांच्या देखरेखीची जबाबदारीही सोपवली होती. ही जबाबदारी त्यांनी नऊ वर्षे सांभाळली. त्या अवधीत त्यांनी गणिताप्रमाणेच भाषाविषयाबद्दलही काही उपक्रम/प्रयोग केले होते. त्यांनी आपल्या प्रयोगांबद्दल 'भाषा आणि जीवन' करता लिहावे, असे आम्ही त्यांना सुचवले. त्यानुसार त्यांनी आपले अनुभव लिहिले आहेत. 'भाषा आणि जीवन' च्या वाचकांकरता आम्ही ते प्रसिद्ध करीत आहोत.)

माझा भाषाशास्त्राचा अभ्यास मुळीच नाही. त्यामुळे या संदर्भात माझ्याकडून चुका होण्याचा पुष्कळ संभव आहे. पण प्राथमिक शाळेत काम करताना तेथील शिक्षकांशी चर्चा होत असे. त्यांच्याकडून मला काही गोष्टी शिकता आणि समजून घेता आल्या. त्या माहितीच्या आधारावर मी काही प्रयोग केले आणि काही उपक्रमही चालू केले. पण माझ्या ज्ञानाच्या ह्या मर्यादित कक्षा ध्यानात ठेवाव्यात, अशी वाचकांना माझी विनंती आहे.

मी नू.म.वि. मराठी शाळा आणि शिशुशाळा ह्या संस्थांच्या प्रमुख पदी १९६३-६६ आणि १९७२-७८ असे दोन हप्त्यांत मिळून एकूण ९ वर्षे होतो. पहिल्या वेळी नवीनपणामुळे फारसे काही केले नाही. जे काही प्रयोग/उपक्रम केले, ते सारे नंतरच्या काळातच. वर्गातील संख्या कमी करणे, प्रवेशाचे वय वाढवणे, गृहपाठ कमी अथवा रद्द करणे, लेखी परीक्षेऐवजी तोंडी, दप्तराचे ओझे कमी करणे, शिक्षणक्रमसदृश विषयांचा अंतर्भाव, वगैरे अनेक. पण ह्या लेखात केवळ मी भाषाशिक्षणाच्या दृष्टीने केलेल्या प्रयोगांची आणि उपक्रमांची माहिती देणार आहे.

अध्ययनाच्या बहुविध कामांतील मुख्य आणि पायाभूत काम म्हणजे भाषाविषय शिकणे. विशेषतः, ज्ञानग्रहणाच्या भाषेचे अध्यापन. मग ती मातृभाषा असेल किंवा

आजच्या जमान्याप्रमाणे कदाचित इंग्रजीही असेल. ज्या वेळी बालक नवीन वस्तूंचे ज्ञान आणि तिच्याबद्दल ऐकणे-बोलणे ह्या क्रिया एकाच वेळी करीत असते, त्या वेळी भाषा शिकणे त्याला दुहेरी कठीण जात असणार. 'बालकांची ज्ञानग्रहणाची भाषा' ह्या शब्दांमुळे मला हे अभिप्रेत आहे. जसे हे बालकांना कठीण जात असावे, तसे ते शिक्षकांनाही शिकवताना कठीण जात असावे. पण भाषा हे ज्ञानग्रहणाचे मुख्य साधन असल्यामुळे ती तर शिकणे अटळ आहे.

प्राथमिक आणि शिशू शाळांप्रमाणेच मला आमच्या संस्थेच्या मूकबधिर विद्यालयाचा प्रमुख म्हणूनही काही वर्षे काम करण्याची संधी मिळाली. ज्यांना ऐकूच येत नाही, त्यांना बोलायचे कसे, हे समजण्यात किती अडचणी येत, आणि ते शिकवताना शिक्षकांना काय त्रास पडे, हे मी समक्ष अनुभवले आहे; आणि भाषाच योग्य रीतीने, किंवा परिपूर्णपणे शिकता आली नाही, त्यामुळे ज्ञानग्रहणाची कित्येक दालने त्यांच्याकरता उघडलीच गेली नाहीत, हेही पाहिले आहे. तेथील अडचणींची कल्पना आपल्यासारख्यांना येणेच शक्य नाही. अगदी हेलन केलरच्या चरित्राची पारायणे केली, तरी.

आम्हांला फ्रेंच भाषा शिकवण्याकरता फादर डलरी नावाचे एक उत्तम शिक्षक लाभले. उत्तम असे म्हणण्याची काही कारणे आहेत. पैकी एकाचा उल्लेख करतो. फ्रेंच शिकायला मिळाले, ह्यात काहीच नवल नाही. कारण त्याच कामाकरता मी जात होतो. पण इतरही अनेक बाबी त्यांच्यामुळे मला कळल्या; आणि भाषाविषयाच्या बाबतीत नवीन दृष्टीही मिळाली. तिचाच उपयोग मला प्राथमिक आणि शिशू शाळांतील कामात करता आला. त्यांचे ऋण ह्या निमित्ताने मी व्यक्त करीत आहे.

१) फादर डलरींनी आम्हांला फ्रेंच भाषेतील गाणी शिकवली. ते म्हणायचे, 'गाण्यांतून भाषा लवकर आत्मसात होते.' त्याचा अनुभव आम्हांला त्याच वेळी म्हणजे फ्रेंच शिकतानाच आला. नाही तरी लहान मुलांना आपण बडबडगीते शिकवतोच. त्यातही जर गाणी संगीतबद्ध असतील, तर ती चांगली ताला-सुरावर म्हणता येतात; आणि त्याच कारणामुळे ती आणखी लवकर पाठ होतात. हा मुद्दा लक्षात ठेवून, मी आमच्या संगीत शिक्षिकांना त्या दृष्टीने काम करण्यास सांगितले. मारुलकरबुवा, गांधर्व महाविद्यालयाचे श्री. पंडितबुवा वगैरे संगीतज्ञांच्या मदतीने काही संगीतबद्ध गाणी निवडली. प्रत्येक इयत्तेकरता १६ पर्यंत गाणी निवडली. त्यातही चार ताल आणि चार राग येतील, अशी काळजी घेण्याचा प्रयत्न केला. ह्या गाण्यांच्या पुस्तिका छापवून घेतल्या व त्या मुलांना (विनामूल्य) दिल्या.

एक वर्षात ही गाणी शिकवावीत, असे मी बाईंना म्हटले. त्या थोड्या नाराज दिसल्या. त्या म्हणाल्या, 'मला प्रत्येक वर्गावर आठवड्यात फक्त एकच तास असतो. त्यामुळे ही सर्व गाणी एका वर्षात होणार नाहीत; आणि दुसरं म्हणजे, इतकी गाणी





अनुक्रमणिका

रोज म्हणायचा मला किती त्रास होईल?' त्यांची अडचण लक्षात घेऊन मी त्यांना एक टेपरेकॉर्डर घेऊन दिला. आणि म्हटले, 'आता तुम्ही गाणी पेटीच्या सुरावर आणि तबल्याची साथ घेऊन तुमच्या आवाजात टेप करा.' त्यांच्या पहिल्या मुद्द्याबद्दल मी त्यांना एक सवलत दिली. मी म्हटले, 'सर्व गाणी झालीच पाहिजेत, असं बंधन मी तुमच्यावर घालू इच्छीत नाही. हा आपला एक प्रयोग आहे. आपल्याला कुठं कल्पना आहे, की किती गाणी होऊ शकतात? होतील, तेवढी करा. मात्र केवळ तुम्हांला कंटाळा आला, म्हणून आळस करू नका.' हा आमचा प्रयोग जुलैच्या दुसऱ्या पंधरवड्यात सुरू झाला. आपल्याला नवल वाटेल. आम्हीही चकित झालोच होतो. बालकांच्या ग्रहणशक्तीची चुणूकच आम्हांला पाह्यला मिळाली. ऑगस्ट किंवा सप्टेंबरच्या शेवटच्या आठवड्यात असेल, त्या मला भेटल्या आणि म्हणाल्या, 'सर, आत्ताच मुलांची सर्व गाणी पाठ झाली आहेत. आणखी गाणी शिकवा, असं म्हणताहेत मुलं. आता काय करायचं?' आणि, तालासुरावर म्हटलेली गाणी फार लवकर पाठ होतात, हा मुद्दा प्रकर्षानं सिद्ध झाला. उलट, मुलांची भूक भागवताना बाईंचीच दमछाक झाली. गाणी आली, म्हणजे तेवढ्यापुरती तरी भाषाही आली नाही का?

त्यातही मी आणखी एक हेतू साधून घेतला. ह्या निमित्ताने मुलांना संगीताचीही ओळख करून देण्यास सुचवले. बाईंना मी म्हटले होते, 'गाणं शिकवून झालं, की त्याचा राग आणि ताल मुलांना सांगा. रागाची आणि तालाची तांत्रिक माहिती देत बसू नका. पण नकळत संगीताचा संस्कार होत असेल, तर काय वाईट आहे?' असो, हे विषयांतर झाले. कारण संगीत शिकवणे हे काही आमचे काम नव्हते.

२) संस्कृत हाही माझ्या आवडीचा विषय. म्हणून ह्याच प्रकारचा पण थोडासा निराळा असा आणखी एक उपक्रम आम्ही शिशुशाळेतही सुरू करण्याचं ठरवलं. संस्कृतचे एक पंडित, मूळचे नागपूरचे, डॉ. वर्णेकर ह्यांनी संस्कृतमध्ये काही गाणी लिहिली असल्याचं मला कळलं; आणि त्यांची पुष्कळशी गाणी त्यांच्या भावजय श्रीमती लताबाई वर्णेकरांनी ती संगीतबद्ध करून टेप केली आहेत, अशीही माहिती मिळाली. त्यांच्याशी संपर्क साधून मी त्या गाण्यांची प्रत करून घेतली आणि शिशुशाळेच्या मुख्याध्यापिकांना एक कल्पना सांगितली. मी त्यांना म्हणालो, 'ह्यांतली दोन किंवा तीन गाणी रोज वाजवायची. मुलांच्याकडून म्हणून वगैरे घ्यायची जरुरी नाही.' विचार केला, काय होते, ते पाहू या तरी. आता मला नेमके आठवत नाही; पण वीस गाणी असावीत. सुमारे दीडेक महिन्यात मुलांची सगळी गाणी पाठ झाली. मला वाटले, पद्यरूप भाषा तर लवकर येतेच. पण, संगीताचा आधार घेतल्यास मातृभाषाच काय, कोणतीही भाषा लवकर येईल. ह्या सिद्धांताच्या सत्यतेबद्दल भाषाशास्त्री काही सांगू शकतील. येथे मी स्वतःचे केवळ दोन अनुभव मांडले आहेत.

३) येथे एका फसलेल्या प्रयोगाचाही उल्लेख केला पाहिजे. माझ्या हातांत शिशुशाळेच्या दोन इयत्ता प्राथमिक शाळेच्या चार इयत्ता, अशा सहा इयत्ता, प्रत्येकी

सहा तुकड्या, मिळून एकूण सुमारे सत्राशे बालके होती; आणि कोणताही शैक्षणिक उपक्रम करण्याचा पूर्ण अधिकार होता. काही प्रमाणावर कर्तुम् अकर्तुम् असाच म्हणा ना. पद्यरूप भाषा लवकर आत्मसात होते, हे तर तोवर समजूनच आले होते. संस्कृत भाषा हा काही प्राथमिक पातळीवर शिकवला जाणारा विषय नव्हे. पण म्हणून संस्कृत शिकवण्यास बंदी होती, असेही समजण्याचे कारण नव्हते. आणि संस्कृतमुळे वाणीवर चांगले संस्कार होतात, असेही पूर्वी ऐकले होते. तेव्हा संस्कृतकडे मोर्चा वळवावा, म्हणून माझ्या परिचयातील काही पंडितांना विनंती केली. शंभर शंभर श्लोकांचे सहा संच बनवून देण्यास त्यांना सुचवले. म्हणायला सोप्यापासून सुरुवात करून क्रमाने काहीसे अवघड झाले, तरी चालतील, असा विचारही सांगितला. योजना अशी होती, की अशा पुस्तिका छापवून घेऊन मुलांना त्या (शक्य झाल्यास विनामूल्य) द्यायच्या. आणि त्यांतील श्लोक पाठ करून घ्यायचे. पण काही ना काही कारणामुळे ही योजना प्रत्यक्षात उतरू शकली नाही. अन्यथा प्रवेश केल्यापासून शाळा सोडीपर्यंत मुलांचे सहाशेपर्यंत श्लोक सहजरीत्या पाठ झाले असते.

मात्र हा प्रयोग निराळ्या तऱ्हेने मी घरी नातवंडांवर केला. जी स्तोत्रे पाठ करून घ्यायची असतील, ती टेप करून रोजच्या रोज ऐकवायची. हा प्रयोग कुणीही आपापल्या घरी करू शकेल. नाही तरी सतत कानांवर पडल्यामुळे सिनेमाची गाणी सहज पाठ होतात, हा आपला नेहमीचा अनुभव आहेच की!

थोडे विषयांतर करतो. संस्कृत ही ब्राह्मणांची किंवा तथाकथित उच्चवर्णीयांची भाषा असल्याचा एक गैरसमज दूर करता येईल, ह्या विचाराने आणखीही एक कल्पना मी अनेक संस्कृत-पंडितांपुढे मांडली. पण दुर्दैवाने, ह्या कल्पनेची दखल घ्यावी, असे त्यांतल्या एकालाही वाटले नाही. डॉ. आंबेडकरांना देवाप्रमाणे मानणारा एक मोठा वर्ग आपल्या समाजात आहे. डॉ. आंबेडकरांच्या चरित्रावर आणि विचारांवर आंबेडकर शतक, किंवा शक्य झाल्यास शतकत्रयी सुद्धा त्यांनी लिहावी. त्यामुळे आजवर काही ना काही कारणाने दुरावलेला आपल्या समाजाचा एक फार मोठा अंश संस्कृतमार्गे विनायास जवळ येऊ शकेल, असे मला वाटत होते. अजूनही कोणी पंडिताने हे काम अंगावर घेण्यास हरकत नाही. नव्हे घ्यावेच, इतके त्याचे महत्त्व राष्ट्रीय आणि भावनिक एकात्मतेच्या दृष्टीने आहे, असे मला वाटते. समाजचिंतकांनीही अधिक गंभीरपणे विचार करायला हवा.

४) हा चौथा उपक्रम माझ्या कल्पनेनुसार नवीन आणि महत्त्वाचा होता. जरी अप्रस्तुत वाटला, तरी येथे एक मुद्दा मांडण्याचा मोह होतो. मला वाटते, आपल्या शिक्षणाच्या परिपाठात लेखनाची आपण फार घाई करतो. लेखनाला सुरुवात करण्यापूर्वी वाचनाच्या टप्प्याकरता भरपूर अवसर दिला पाहिजे, असे मला वाटते. वाचण्यातून भरपूर अक्षरओळख (खरे तर- शब्दओळख) होईपर्यंत लेखनाकडे वळू नये.

असे मला, अजूनही वाटते. तसे केले, तर नंतर लेखनाचे काम खूपच सोपे जाईल. काही अक्षरे लिहिताना मुले जो घोटाळा करतात, तो टळेल, असे मला (अजूनही) वाटते. ह्या विचाराचा आणखी एक लाभ म्हणजे, एकाच वेळी वाचन आणि लेखन अशा दोन दोन डगरींवर हात ठेवावे लागल्यामुळे होणारा त्रासही कमी होईल. तसे मांडण्याचा मी खूप प्रयत्न केला. पण आपले मूल जगाच्या मागे पडेल, या भीतीने पालक तयार होणार नाहीत, असे सर्व शिक्षकवर्गाचे ठाम मत पडल्यामुळे मला आपला आग्रह सोडून द्यावा लागला. असो. आणि आम्ही शाळेत कितीही नवीन प्रयोग केले, तरी घरी शिकवणाऱ्या पालकांचे प्रमाण, आमच्या शाळेपुरते पुष्कळच आहे. जिची लिपी देवनागरी नाही, अशी एखादी परकीय भाषा शिकण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे माझा मुद्दा लक्षात येईल.

भाषेच्या अध्यापनात चार टप्पे मानले जातात. ऐकणे, बोलणे, वाचणे आणि लिहिणे. ऐकणे तर जन्मापासूनच चालू असते; आणि बोलता येऊ लागले, की बोलणे चालू होते. ह्या दुसऱ्या टप्प्यासाठी आपण काही खास परिश्रम घेत असतो, असे दिसत नाही. म्हणजे अध्यापनातला तो बुद्धिपुरस्सर अवलंबण्याचा टप्पा मानला जात नाही. तसा तो असावा, की नाही, हा एक विचार करण्यासारखा मुद्दा आहे, असे मात्र वाटते. आणि त्या दृष्टीने माझा संगीतबद्ध पद्यांच्या पाठांतराचा वरील प्रयोग करून पाहण्यासारखा आहे. वाचन आणि लेखन हे तर अभ्यासाचा भाग मानले आहेत, हे निर्विवाद.

लेखनाचा विचार मागे ठेवण्याच्या माझ्या कल्पनेला जरी शिक्षकवर्गाने अनुकूलता दाखवली नाही, तरी पण वाचनाचा वेग वाढवण्याकरता काही प्रयोग करण्याची तयारी मात्र त्यांनी दाखवली. त्या दृष्टीने काही जादा कष्ट करण्याचीही शिक्षकांची तयारी होती. खरे म्हणजे, ह्याच उपक्रमाबद्दल तपशिलाने लिहायला हवे आहे. कदाचित हा उपक्रम सार्वत्रिकपणे अमलात आणण्याच्या लायकीचाही ठरू शकेल. ह्या उपक्रमात आम्ही काही टप्पेही केले. भाषा शिकवण्याच्या आज सर्वमान्य असलेल्या पद्धतीमध्ये प्रथम वर्ण मग शब्द आणि नंतर वाक्य असाच क्रम असतो. पण, अक्षरांपासून सुरुवात करण्याऐवजी शब्दांपासून सुरुवात करणे, हे उपक्रमाचे मुख्य अंग होते. कारण नुसत्या अक्षरांना भाषेत अर्थाअर्थी स्थान नाही. म्हणजे एकेकटी येतात, तेव्हा ती अर्थहीन असतात. (व, न, असे अपवाद वगळता.) म्हणून प्रथम आम्ही दोन अक्षरी शब्दांची यादी करण्याचे काम सुरू केले. मात्र, कोठलाही शब्द निवडताना काही कसोट्या ठेवल्या.

(अ) तो शब्द म्हणजे एखाद्या वस्तूचे नाव पाहिजे. कल्पनेचे नाव किंवा, भाववाचक नामे आम्ही यादीत घेतली नाहीत.

(आ) दुसरी कसोटी म्हणजे जोडाक्षरे नसावीत.

प्रथम अकारादी स्वरांनाही पहिल्या यादीत स्थान दिले नाही आणि प्रत्येक शब्दापुढे त्या त्या वस्तूचे चित्र ठेवले.

शिक्षकांनी मुलांना चित्र दाखवायचे आणि शब्द उच्चारायचा. मुलांनी पाठोपाठ तो शब्द उच्चारायचा. उच्चारताना सुद्धा अक्षरे न वाचता एखादी प्रौढ व्यक्ती तो शब्द जसा वाचील, तसा एकदम वाचायचा. बोलताना किंवा वाचतानाही, आपण सर्वच अक्षरांचा पूर्ण उच्चार करीत नाही. उदाहरणार्थ, घऽर् असे बोलतो किंवा वाचतो. म्हणजे 'र' ह्या अक्षराचा उच्चार पूर्ण करीत नाही; आणि घ वाजवीपेक्षा लांबवतो. जणू काही 'घर' हेच एक पूर्ण अक्षर आहे. अशा थाटात तो शिक्षकांनीही वाचायचा आणि त्यांच्या मागोमाग मुलांनीही वाचायचा. एक शब्द त्याच्या चित्रासहित वाचून झाला, की दुसरा शब्द. ह्या प्रमाणे रोज काही शब्दांचे वाचन करवून घ्यायचे.

पहिला टप्पा : दोन अक्षरी शब्द, मग तीन अक्षरी आणि मग चार अक्षरी शब्द, अशी क्रमशः अक्षरसंख्या वाढवीत नेली.

दुसरा टप्पा : हळूहळू अकारादी स्वर आणि जोडाक्षरे ह्यांचाही अंतर्भाव करण्यास सुरुवात केली.

तिसरा टप्पा : दोन शब्दांची वाक्ये, तीन शब्दांची वाक्ये ह्याप्रमाणे तेथेही टप्प्यांनी शब्दसंख्या वाढवीत नेली.

चौथा टप्पा : एखाद्या प्राण्याचे चित्र काढायचे आणि त्याच्या खाली त्या प्राण्याबद्दल पाच-सहा वाक्ये लिहायची. पद्धत सगळीकडे तीच. प्रथम शिक्षकांनी वाचायचे, त्यांच्या पाठोपाठ मुलांनी वाचायचे.

सांख्यिकीय पद्धतीप्रमाणे दोन गट करून त्यांची तुलना करणे जरुरीचे असले, तरी ते शक्य नव्हते. शिवाय, अशा तऱ्हेच्या प्रयोगाला आपल्याकडे पालक सहसा तयार होत नाहीत. त्यामुळे आमच्या ह्या अनुभवाला सिद्धांताचा दर्जा मिळण्यासारखे नव्हते. तरीही मुलांचा वाचनाचा वेग वाढला होता, हे आम्हां सर्वांना जाणवत होते. त्यामुळे हा प्रयोग मोठ्या प्रमाणावर करून पाहण्यासारखा आहे.

भाषाशास्त्रात गती नसतानाही माझ्या कल्पनेनुसार शक्य झाले, ते प्रयोग आणि उपक्रम केले. त्यांची माहिती तज्ज्ञांपुढे मांडली आहे. कदाचित आणखीही कोणी असे प्रयोग केले असतील, आणि मला त्यांची माहिती नसण्याचा संभव आहे. माझ्या ह्या प्रयोगांबद्दल आणि उपक्रमांबद्दल त्यांचे विचार जाणून घेण्याची माझी इच्छा आहे.

**'गजांजली', ४६, वाळवेकर इस्टेट, पुणे ४११००९.**



# भारतीय अर्थविचाराची पूर्वपीठिका

दा.ल.अडोणी

**विषयप्रवेश :**

भाषा हे लोकव्यवहाराचे एक सुगम आणि सर्वश्रेष्ठ साधन असून, शब्द हा तिचा मूलभूत महत्त्वाचा घटक ठरतो. प्राचीन काळापासून मानवाच्या ठिकाणी शब्दाविषयी विस्मय, कुतूहल व जिज्ञासा या भावना उत्पन्न झाल्या होत्या, असे दिसते. शब्दाचा महिमा बहुधा सर्व भाषांत आणि धर्मग्रंथांत गायिलेला आढळतो. त्याचे सामर्थ्य जाणवते, ते त्याच्या ठायी असलेल्या बोधकशक्तीमुळे. साहजिकच याही बाबीचा विचार पूर्वीपासून होत आला आहे.

शब्द आणि अर्थ यांतील परस्परसंबंधाचे, तसेच शब्दांतून प्रतीत होणाऱ्या- अनुभवास येणाऱ्या- अर्थाचे परिवर्तन यांचे पद्धतशीर अध्ययन म्हणजे वागर्थविज्ञान वा शब्दार्थशास्त्र असे म्हणता येईल. तथापि, अर्थशास्त्र ही संज्ञा धन, संपत्ती व तत्संबद्धक बाबींचा विचार करणाऱ्या (इं. Economics) या एका सामाजिक शास्त्राच्या संबंधात रूढ आहे. तेव्हा भाषाशास्त्राच्या एका अंगाला ते नाव दिले, तर घोटाळा माजेल. अलीकडे हिंदी, मराठी, इ. भाषांत या विषयाचा विचार करणारे ग्रंथ वा प्रबंध 'अर्थविज्ञान' हे नाव घेऊन प्रसिद्ध झाले आहेत. याला इंग्रजीत Semantics हे नाव प्रचलित झाले आहे.

शब्दार्थविमर्शासंबंधात 'अर्थविज्ञान' या पदाची निश्चिती करण्यास परंपरेचाही आधार आहे.

*१) शुश्रूषा श्रवणं चैव ग्रहणं धारणं तथा ।*

*ऊहापोहोऽर्थविज्ञानं तत्त्वज्ञानं च धीगुणाः [१] ।।*

*२) यथा च चोदनाशब्दो वैदिक्यामेव वर्तते ।*

*शब्दज्ञानार्थविज्ञानशब्दौ शास्त्रे तथा स्थितौ [२] ।।*

व्यासांनी बुद्धीच्या सात गुणांचा निर्देश करताना अर्थविज्ञान म्हणजे अर्थतत्त्वाचे व्यवस्थित ज्ञान याचा त्यात समावेश केला आहे. कुमारिलभट्ट, मंडनमिश्र, इ. पंडितांनी प्रस्तुत पदाचा उपयोग असाच पारिभाषिक अर्थाने केलेला आढळतो.





अनुक्रमणिका

बोलताना आपण शब्दांचा वापर करतो. हे शब्द ध्वनींनी बनलेले असतात. शब्दांचा उच्चार होताच ते ध्वनी हवेत विरतात. अशा अल्पजीवी शब्दांचे जतन करण्यासाठी मनुष्याने पुढे लिपीचा शोध लावला आणि त्या ध्वनिमय शब्दाला अक्षररूप दिले. टप्प्याटप्प्याने आशय व अभिव्यक्ती या दोन्ही अंगांनी भाषेचा विकास झाला आणि कालान्तराने ती स्वतः अभ्यासाचा एक विषय बनली.

भाषेचा अभ्यास ध्वनी, रूप, अर्थ, वाक्य व व्युत्पत्ती या पाच अंगांनी बहुधा करतात. पाश्चात्त्यांच्या भाषाशास्त्रात अर्थविज्ञान हे स्वतंत्रपणे असे १९ व्या शतकात विकसित झाले. प्राचीन ग्रीक व लॅटिन ग्रंथांत शब्दार्थविषयक स्फुट विचार आढळतात. शब्दातील अर्थपरिवर्तन हे समाजाच्या बदलत्या मनोवृत्तीचे निदर्शक ठरते, या गोष्टीकडे पंडितांचे विशेष लक्ष वेधले होते. 'भाषेचा लघुतम सार्थ घटक' अशी ॲरिस्टॉटलने प्रथमच शब्दाची व्याख्या केली आणि शब्दांचे 'अर्थवान्' व 'संबंधदर्शक' असे वर्गीकरण केले होते. पुढे रेशिग (C. Reigzig) हर्मन पॉल, डार्मेस्टेटर व ब्रेआल (M. Bre'al) या गेल्या शतकातील भाषाविज्ञांनी अर्थविज्ञानाची पायाभरणी केली. ब्रेआल या फ्रेंच अर्थवेत्त्याने केलेले Semantics हे या विद्याशाखेचे नामकरण सर्वमान्य झालेले आहे. मानस, समाज, पुरातत्त्व, इ. शास्त्रांचे साह्य घेऊन पाश्चात्त्यांनी गेल्या अर्धशतकात या क्षेत्रामध्ये विलक्षण प्रगती केली आहे.

भारतात भाषाविषयक विचाराचा प्रारंभ फार प्राचीन काळापासून झालेला दिसतो. वेदात वाक्तत्त्वाचे वर्णन विविध प्रकारांनी केलेले असून ऋषींनी वाचेची-वाणीची महती परोपरीने गायिलेली आहे. 'वाग्वैसम्राट् परमं ब्रह्म' वाणी हेच सर्वश्रेष्ठ ब्रह्म होय. असे बृहदारण्यक उपनिषदात (अ.४.२) म्हटले असून ऋग्वेदात तर वाचेचे स्वसामर्थ्य-विषयक आत्मनिवेदनही आढळते.[३] अन्यत्र 'देवीं वाचमजनयन्त देवास्तां विश्वरूपा पशवो वदन्ति'[४] देवांनी दिव्यवाणी उत्पन्न केली. सारे मनुष्यप्राणी तिचाच उपयोग करतात, असे म्हटले आहे. 'चत्वारि शृंगा त्रयो अस्य पादा[५]--' या मंत्राचा अर्थ निरुक्तकार यास्काचार्यांनी यज्ञपर, तर महाभाष्यकार पतंजलींनी व्याकरणानुकूल लावला आहे. (तो असा-चत्वारि पदजातानि नामाख्यातोपसर्गनिपाताश्च । त्रयो अस्य पादास्त्रयः काला भूतभविष्यद्वर्तमानाः। महादेवः शब्दः।)[५+] 'चत्वारि वाक्परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः। गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति।'[६] वाणीची मोजकी चार पदे म्हणजे स्थाने आहेत. पहिली तीन स्थाने-क्रमशः परा, पश्यन्ती व मध्यमा या वाणींची - शरीराच्या आत असल्यामुळे गूढ आहेत. आत्मज्ञानी ब्राह्मणांना- ब्रह्मविदांना त्या सूक्ष्म वाणींचे ज्ञान असते. ध्वनिरूपाने मुखावाटे बाहेर पडणारा वैखरी हा चौथा प्रकार तेवढा लोकव्यवहारात येतो. तेवढ्यामुळेही ज्ञानसंपन्न झालेला मानव इतर प्राण्यांहून श्रेष्ठ ठरला आहे.

वेदांचे[७] सांगोपांग व व्यवस्थित अध्ययन करण्यासाठी शिक्षादी सहा शास्त्रे निर्माण झाली. त्यांपैकी शिक्षा, निरुक्त व व्याकरण ही भाषाविज्ञानात्मक असून, त्यांत क्रमशः

ध्वनि (वा वर्ण), अर्थ व व्युत्पत्ती आणि रूप (प्रकृती-प्रत्यय) या दृष्टींनी विवेचन केलेले आहे. निरुक्तांत 'निघंटू' तील वैदिक पदसंग्रहातील शब्दांची व्युत्पत्ती सांगून त्यांच्या अर्थाचेही विवरण केले आहे. यास्काने या अनुसंधानाने अर्थविज्ञानातील मूलभूत मुद्‌द्यांचा ऊहापोह केला. कालान्तराने दुर्बोध झालेल्या वैदिक पदांचे निर्वचन करणारा 'निरुक्त' हा व्युत्पत्तिशास्त्रावरील प्रथम प्राचीनतम ग्रंथ होय, असे म्हणता येईल.

**'निरुक्ता'तील निरूपण-** शब्द नित्य, की अनित्य, या चर्चेत यास्कांनी पूर्वपक्ष म्हणून 'इंद्रियनित्यं वचनम्' शब्द इंद्रियाधीन आहे, बोलणे इंद्रियावर अवलंबून असते. हा औदुंबरायण या वैयाकरणाचा विचार आधी पुढे ठेवला. मग 'व्याप्तिमत्त्वात्तु शब्दस्य अणीयस्त्वाच्च शब्देन संज्ञाकरणं व्यवहारार्थं लोके।'[८] शब्द हा सर्वकाळी व्याप्त वा विद्यमान असतो. तो स्वल्परूप असल्यामुळे व्यवहारात नामकरणासाठी वस्तुबोधासाठी- उपयोजिला जातो, असे यास्कांनी त्या मताचे निराकरण केले आणि शब्दाचे नित्यत्व सांगितले आहे. वाग्व्यवहार इंद्रियाश्रित आहे, बोलण्या-ऐकण्याची क्रिया चालू असताना शब्द एका मागून एक लुप्त होतात, त्यांचा परस्परांशी अन्वय- व्याकरणाने ठरविलेला सुसंगत संबंध- जुळत नाही, हा पूर्वपक्षाचा आक्षेप आहे. त्याचे खंडन पुढीलप्रमाणे केले आहे. उच्चारलेले शब्द जरी नश्वर असले, तरी मूळ स्फोटरूप शब्द नष्ट होत नाहीत. शब्द आणि त्यांचे अर्थ वक्त्याच्या व श्रोत्याच्या मनात स्थिर असतात, ऐकलेले शब्द लोपले तरी त्यांचे मूळ मनात स्मृतिरूपाने राहतेच, अशी यास्कांची विचारसरणी आहे. दुसरे, शब्दाने थोडक्यात पुष्कळ अर्थाचा बोध करता येतो. शब्दात लाघव-आटोपशीरपणा आहे. त्यामुळे नामकरणासाठी संकेत ठरविण्यासाठी तो उपयुक्त ठरतो.

'चतुष्टयी शब्दानां प्रवृत्तिः।' - नाम, आख्यात (धातू-क्रियारूप) उपसर्ग आणि निपात (अव्यय) हे शब्दांचे चार वर्ग होत. 'भावप्रधानमाख्यातम्। सत्त्वप्रधानानि नामानि।'[९] असे पहिल्या दोहोंचे स्वरूप यास्कांनी विवरिले आहे. 'आख्यातजानि नामानि'- नामे ही क्रियारूपांपासून बनलेली असतात, हे शाकटायनादी पूर्ववैयाकरणांचे मत त्यांना मान्य होते. गार्ग्यादी काही व्याकरणकारांना मात्र सर्वच नामे धातु-ज नसतात, असे वाटते. यास्कांनी नामकरणाविषयी मांडलेले विचार पुढील आक्षेप-परिहारातून स्फुट होतात.

'जर सर्वच नामे धातुज असतात, असे मानले, तर जे प्राणी (सत्त्व) एखादी क्रिया करताव, त्या सर्वांना तेच नाव मिळाले पाहिजे. म्हणजे मार्ग आक्रमण करणाऱ्या साऱ्यांना 'अश्व' आणि बोचणाऱ्या (केवळ गवत नव्हे, तर सुई, खिळा, बाण, इ.) सर्व वस्तूंना 'तृण' असे म्हटले पाहिजे.[१०] दुसरे, जर सर्व नामे धातुज असती, तर एखादी वस्तू जितक्या क्रियांशी संबद्ध असेल, तितक्या क्रियांवरून तिला नावे मिळाली असती. याप्रमाणे स्थूणा (=खांब) याला दरशया व आसंजनी असेही म्हटले पाहिजे.[११]

यास्कांनी या मुद्द्याचे निराकरण पुढीलप्रमाणे केले आहे. 'जे कोणी एखादी क्रिया करतील, त्या सर्व प्राण्यांना तेच नाव असले पाहिजे, असे म्हटले खरे. पण आपण पाहतो, की समान कार्य करणाऱ्यांपैकी काहींनाच ते नाव मिळते, इतरांना नाही. जसे तक्षा (सुतार), परिव्राजक (संन्यासी), जीवन (पाणी), भूमिज (वृक्ष वा मंगळ ग्रह).[१२]

यावरून वस्तूला किंवा व्यक्तीला मिळालेले नाव तिच्या कोणत्या तरी कार्य-क्रियाविशेषामुळे रूढ होते, असे म्हणता येते. दुसरे, नामकरण कसे अपूर्ण असते, वस्तूचा सारा काही तदन्तर्गत भाव (connotation) व्यक्त करत नाही, हे स्पष्ट होते. विशेषीकरणामुळे अर्थसंकोच होतो, हेही या निवेदनात सूचित केले आहे.

याशिवाय निर्वचनाच्या अनुषंगाने सादृश्य[१३] व साहचर्य[१४] यामुळे अर्थपरिवर्तन कसे संभवते, देशभेदामुळे पदाच्या प्रचलित अर्थात अंतर पडते.[१५] भाषेत समानार्थक,[१६] अनेकार्थक[१७] आणि ध्वन्यनुकारी[१८] शब्द असतात, अर्थ कित्येकदा अस्पष्ट आणि अनिश्चित प्रतीत होतो,[१९] व्युत्पादन प्रकरणानुसार करावे,[२०] इ. आधुनिक अर्थविज्ञानात महत्त्वाच्या मानलेल्या मुद्द्यांचा सोदाहरण निर्देश या प्राचीन ग्रंथात आढळतो.

आधुनिक अर्थविज्ञानात 'संदर्भा' ला (इं contextला) विशेष महत्त्व दिले जाते. व्युत्पादनासह अर्थबोधन हे प्रकरणानुसार करावे हे यास्काचार्यांनी आवर्जून सांगितले आहे. अर्थविचाराची त्यांना वाटणारी महती निर्वचनाच्या म्हणून सांगितलेल्या पुढील काही आदेशांवरून स्पष्ट होते. अ) अथ अनन्वितेअर्थे अप्रादेशिके विकारे अर्थनित्यः परीक्षेत केनचिन् वृत्तिसामान्येन (निरुक्त २.१.१ आ) न एकपदानि निर्ब्रूयात्। नि.२.३ इ) यथार्थं निर्वक्तव्यानि। नि. २.७

जेथे धातु-प्रत्ययावरून अर्थाचा संबंध स्पष्टपणे प्रतीत होत नसेल व व्याकरणानुसार होणारे (वर्णागम, वर्णलोप, इ. रूपविकारातील) परिवर्तन आढळत नसेल, तर तेथे अर्थ मुख्य मानून निर्वचन करावे. म्हणजे अर्थ विचारात घेऊन भावानुकूल धातुरूप शोधावे. ते काहीसे (वर्णलोपादी वृत्तींना धरून) जुळणारे असले, तरी पुरे. एकट-सुट्या शब्दांची (अर्थासह) व्युत्पत्ती सांगू नये. व्युत्पादन नेहमी अर्थाला धरून असावे.

निरुक्तात स्वरसंस्कारांचा,[२१] आघातांचा आणि प्रत्यय लागून बनलेल्या नामादिकांचा विचार केलेला आहे. तथापि, शब्दातील ध्वनीच्या उच्चारपद्धतीचे 'वाच उच्चारण विधी' चे सूक्ष्म व सविस्तर विवरण प्रातिशाख्ये व शिक्षा ग्रंथ यांत आढळते. एखाद्या अक्षरावर विशेष जोर देऊन उच्चार केला, तर स्वरभेदामुळेही अर्थात फरक पडतो. प्रसंगी विपरीत वा विरुद्ध अर्थ निष्पन्न होतो, हे पाणिनिकृत 'शिक्षे' त पुढील समर्पक उदाहरण देऊन सांगितले आहे.

*मंत्रोहीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह।*

*स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोपराधात्॥ पा. शिक्षा५.५२*

स्वराची किंवा वर्णाची उणीव असलेला- अशुद्ध वा सदोष मंत्र बरोबर न

योजल्यामुळे उच्चारल्यामुळे त्यातून योग्य, इष्ट अर्थ निष्पन्न होत नाही. असा शब्दरूप मंत्र वज्रासारखा घातक होतो.[२२] ज्याप्रमाणे 'इंद्रशत्रु' या पदातील स्वराच्या चुकीच्या उच्चारणामुळे यजमानाचा घात केला, त्याप्रमाणे चुकीचा उच्चार हानिकारक होतो. येथे 'शात्रयिता शत्रुः, म्हणजे घातक, संहार करणारा असा शत्रू पदाचा अर्थ आहे.

**व्याकरणातील विवेचन :** व्याकरणांची रचना निरुक्तापूर्वीच झाली होती. शाकटायन, गार्ग्य, इ. पूर्व वैयाकरणांचे निर्देश, त्यांनी केलेल्या शब्दांच्या नामादी चार प्रकारांचा स्वीकार, इ. वरून हे स्पष्ट होते. उपसर्गांना स्वतःचे अर्थ असतात आणि नाम व धातू यांच्याशी संयोग झाल्यावर ते त्यांना नवा अर्थ देतात, हे गार्ग्यांचे मत यास्काला मान्य होते. पाणिनि, कात्यायन व पतंजलि हे वैयाकरणांतील मुनित्रय असून क्रमशः 'अष्टाध्यायी', तीवरील 'वार्तिक' आणि 'व्याकरणमहाभाष्य' हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. अष्टाध्यायी आधीच सूत्रमय, जोडीला पारिभाषिक संज्ञांनी खचून भरलेली म्हणून पुष्कळांना ती दुर्बोध वाटते. 'वार्तिक' कारांनी कठीणता काहीशी कमी केलेली असली, तरी व्याकरणकारांच्या भाषाविषयक विचारांचा उलगडा होतो, तो 'महाभाष्या'- वरून. नंतरच्या ग्रंथकारांनी स्पष्टीकरणात्मक टीकाग्रंथ लिहून पूर्वसूरींच्या मतांचे विस्ताराने विवरण-विवेचन केले आहे. व्याकरणाचे व तदनुषंगाने वागर्थाचे तात्त्विक विवेचन करणारे ग्रंथ या दृष्टीने पतंजलि 'महाभाष्य' आणि भर्तृहरिकृत 'वाक्यपदीय' यांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

शब्द हा ध्वनीचा-प्रायः ध्वनिसमूहाचा बनलेला असतो. एकानंतर एक आलेले ध्वनी स्वतंत्र व बहुधा निरर्थक असतात. बहुधा म्हणण्याचे कारण असे, की प्रत्येक शब्दातील ध्वनी स्वतंत्रपणे अर्थपूर्ण असतात, असे नाही. ध्वन्यनुकारी शब्दातील ध्वनी तेवढे सार्थ वाटतात. अशा वाचक-बोधक-शब्दांत वाच्याशी निगडित असलेल्या ध्वनीचा अनुनाद अनुभवास येतो. प्रतिध्वनी वा साद-शब्द (echo-words) व भावनाबोधक-उद्गारवाचक शब्द यातही अल्प प्रमाणात ध्वनिप्रतीकता आढळते. उदा., खळाळ, खळखळ, टपटप, धबधबा, पाटेफुटे, गाणेबिणे, छी! आहा! इ. भाषेतील असे काही शब्द सोडले, तर इतर शब्दांतील ध्वनींना वेगळा, स्वतःचा असा अर्थ नसतो. दुसरे शब्दातील ध्वनींना जोडणारा कोणताही दुवा दिसत नाही. असे असता 'गाय' शब्द ऐकल्यावर आपल्याला एका पाळीव प्राण्याचा बोध होतो, तो कशापासून? वर्णापासून, की वर्णघटित शब्दापासून?

**स्फोटतत्त्वः** वैयाकरणांच्या मनी अर्थबोध होतो, तो स्फोटांमुळे. अल्पजीवी ध्वनी कानी पडताच तो हवेत विरून जातो. अशा भंगुर ध्वनींनी बनलेला शब्द ऐकल्यामुळे खरोखर अर्थाचा बोध होत नसून, तो अविनाशी आणि अविभाज्य अशा वाक्तत्त्वामुळे-स्फोटामुळे होतो. ध्वनी वा वर्ण हे त्या चिरंतन स्फोटाचा केवळ आविष्कार करतात. ज्या ध्वनिसमूहामुळे अर्थ समजतो, त्याला 'शब्द' असे म्हणतात. तत्त्वतः स्फोटच शब्द

आहे. ध्वनी केवळ शब्दाचा गुण होय, असे पतंजलीने महाभाष्यात म्हटले आहे.

**एवं तर्हि स्फोटः शब्दः। ध्वनिः शब्दगुणः।**[२२]

याप्रमाणे स्फोट आणि ध्वनी यांत व्यंग्यव्यंजक संबंध आहे. ध्वनी कानी पडताच- वर्णघटित शब्द ऐकताच- स्फोटाचे भान होते, अर्थबोध होतो. भट्टोजी दीक्षितांनी 'सिद्धान्तकौमुदी'त 'स्फुटत्यर्थोऽ स्मादिति स्फोटः।' अशी शब्दसिद्धी करून ज्यापासून आशय-अर्थ स्फुट-व्यक्त होतो त्या 'मूळच्या नित्य शब्दाला' स्फोट म्हणतात, हे स्पष्ट केले आहे. स्फोटतत्त्वाची मूळ कल्पना पाणिनीपूर्वी होऊन गेलेल्या स्फोटायननामक व्याकरणकाराने मांडली असावी, असे म्हणतात.

स्फोटाचे वर्णस्फोट, पदस्फोट व वाक्यस्फोट असे तीन प्रकार संभवतात. ध्वनी क्षणिक म्हणून वैयाकरणांना वर्णस्फोट मान्य नाही. ते वाक्यस्फोट तेवढा खरा मानतात. कारण दैनंदिन व्यवहारात आपण आपले विचार व्यक्त करण्यास वाक्याची योजना करतो. सुट्या शब्दाचा उपयोग यासाठी सहसा करत नाही. एखाद-दुसऱ्या शब्दाने निर्वाह होतो, तो प्रकरणाच्या संदर्भाच्या अनुसंधानाने. असे असूनही वाक्यातील पदे वेगवेगळी कल्पून, त्यांचे नाम, आख्यात, इ. वर्गांत विभाजन करतात, ते संपूर्ण वाक्याचा अर्थ नीट समजण्यासाठी. वैयाकरणांनी पदस्फोटाला जुजबी मान्यता दिली आहे. पदातील शेवटच्या वर्णाचा उच्चार झाला, म्हणजे ऐकणाऱ्याला स्फोट स्पष्ट होतो आणि अर्थ समजतो.

शिक्षादी वेदांगांप्रमाणे न्याय, मीमांसा, इ. दर्शनांतही वागर्थासंबंधात मूलगामी स्वरूपाचे विवेचन केलेले आहे. त्यातील विचारात बरीच भिन्नता दिसते. दर्शनकारांनी कोठे पूर्वपक्ष-उत्तरपक्ष करून आपापल्या मतांचे प्रतिपादन केले आहे. त्यांचे मतभेदही उद्बोधक आहेत.

वेदान्ती, मीमांसक व नैयायिक यांना स्फोटकल्पना मान्य नाही. वर्णांनीच मिळून शब्द बनतो, असे मीमांसक मानतात. त्यांच्या मनी ध्वनी नित्य असून बोलणाऱ्याने उच्चारलेला वर्णघटित शब्द एक भाव किंवा विचार व्यक्त करतो. क्रमाने येणारे वर्ण जरी अश्रुत झाले, लोपले, तरी ते ऐकणाऱ्याच्या मनावर संस्कार करत जातात आणि शेवटच्या उच्चाराने होणारा संस्कार आधीच्या संस्कारांशी संकलित होऊन तो शब्दाच्या अर्थाची प्रतीती करतो. नैयायिक ध्वनींची भंगुरता मान्य करतात. तथापि, आधीच्या वर्णांच्या स्मृतीचा अंतिम वर्णाशी संयोग होऊन पद बनते, ते सार्थ असते, व वाक्याचा घटक बनते, असे त्यांना वाटते. प्रत्यक्ष व अनुमान या प्रमाणांनी स्फोटाची सिद्धी होत नाही, असे त्यांचे मत असून 'स्फोटः शब्दः' हे वैयाकरणांचे वचन त्यांना सयुक्तिक वाटत नाही. कारण 'स्फोट' बुद्धिग्राह्य असून त्याला स्फुट करणारे (पर्यायरूप म्हणून आलेले) शब्द इंद्रियगोचर-श्रव्य ध्वनीचे बोधक आहेत.

संस्कारांचा किंवा स्मृतींचा मेळ होऊन बनलेले ध्वनी वा वर्णघटित शब्द अर्थबोध

करतात, या मीमांसकांच्या व नैयायिकांच्या मतांत काहीशी भिन्नता असली, तरी वैयाकरणांनी पुरस्कारिलेल्या वाक्यस्फोटाला उभयतांचा विरोध आहे. पद स्वतः अर्थबोधक असते, असेही दोन्ही दर्शने मानतात. व्याकरणकारांनीही पदस्फोटाला-पदाच्या अर्थबोधकतेला मान्यता दिली असल्याचे वर सांगितले आहेच. तेव्हा पदापासून अर्थबोध होतो, हे (जोडीस बौद्ध व वैशेषिक मतांसह) सर्वांना मान्य आहे, असे म्हणता येते.

आता शब्द आणि अर्थ यांचे स्वरूप व त्यांचा परस्परसंबंध या अर्थविचारातील महत्त्वाच्या विषयाचा विचार करू.

**शब्दांची अर्थबोधकता :** शब्द हा ध्वनींचा किंवा वर्णांचा समूह असून, तो कोणता तरी भाव, विचार वा कल्पना व्यक्त करण्यासाठी उच्चारण्यात येतो. विवक्षा-बोलणाऱ्याची काही तरी सांगण्याची इच्छा- साऱ्या वाग्व्यवहाराचे आदिकारण होय. वक्त्याच्या इच्छेला अनुसरणाऱ्या (मौखिक) प्रयत्नाने प्रेरित झालेला वायुप्रवाह स्वरतंत्रीवरील आघातामुळे ध्वनीत-शब्दात-परिणत होतो,[२४] असे भर्तृहरीने सांगितले आहे. ध्वनिनिर्मितीची ही प्रक्रिया 'पाणिनीय शिक्षे'त पुढीलप्रमाणे विस्ताराने वर्णिली आहे.

*आत्मा बुद्ध्या समेत्यार्थान्मनो युङ्क्ते विवक्षया।*

*मनोकायाग्निमाहन्ति स प्रेरयति मारुतम् ॥६॥*

*मारुतस्तूरसि चरन् मन्द्रं जनयति स्वरम्।*

'आत्मा बुद्धीच्या द्वारा अर्थाची उपलब्धी करतो व मग विवक्षावश (अर्थाचा बोध करण्याच्या इच्छेने) मनाला प्रेरित करतो. मन कायाग्नीला चालना देते. तो कायाग्नी वायूला चालना देतो त्याप्रमाणे मारुत प्राणवायू गतिमान होऊन तो छातीत शिरून मंद्र स्वर उत्पन्न करतो.' हाच वायू कंठतालव्य, इ. वर्णभेद होऊन मुखावाटे बाहेर पडतो. आपल्या कानी पडणाऱ्या शब्दाचे मूळ स्वरूप कसे सूक्ष्म असते आणि शब्दाचा बुद्धीशी संबंध कसा पोचतो, हे यावरून समजते. भर्तृहरीने हा विचार सोदाहरण स्पष्ट केला आहे.

*अरणिस्थं यथाज्योतिः प्रकाशान्तरकारणम्।*

*तद्वच्छब्दोऽपि बुद्धिस्थः श्रुतीनां कारणं पृथक्॥ वाक्य. १.४६॥*

*वितर्कितः पुरा बुद्ध्या केचिदर्थे निवेशितः।*

*करणेन विवृत्तेन ध्वनिना सोऽनुगृह्यते ।।वाक्य. १.४७॥*

'ज्याप्रमाणे अरणीच्या- शमीच्या खोडाच्या- ठायी (अदृश्य) असणारा अग्नी हा अन्य (प्रकट होणाऱ्या) अग्नीचे कारण असतो, त्याप्रमाणे बुद्धीच्या ठिकाणी (सूक्ष्म रूपाने) असणारा शब्द अनेक नादात्मक श्रुतींचे वा शब्दरूपांचे कारण असतो. आधी

बुद्धीच्या द्वारा अर्थाचा निश्चय करून तदनुसार शब्दाचा प्रयोग करण्यात येतो. इंद्रियांनी स्फुट केलेल्या ध्वनीमुळे-उच्चारलेल्या शब्दामुळे विवक्षिताचे-उद्दिष्ट अर्थाचे ग्रहण होते. यावरून बुद्धिस्थ शब्द[२५] (हाच पतंजलीने म्हटलेला 'स्फोटः शब्दः।') वाणीचे मूळ असून तो कानाला ऐकू येणाऱ्या शब्दाचे कारण ठरतो.

असा अर्थाला धरून उच्चारलेला शब्द थोडक्यात विपुल आशय व्यक्त करतो. याप्रमाणे अर्थयुक्त ध्वनिसमूह म्हणजे शब्द. 'प्रतीतपदार्थको लोके ध्वनिः शब्द इत्युच्यते।[२६]- 'ज्या ध्वनीने व्यवहारात पदार्थाचा प्रत्यय येतो-बोध होतो- त्याला लोकांत शब्द असे म्हणतात.' अशी व्याख्या पतंजलीने केली आहे.

'गाय' शब्द ऐकताच खूर, शिंगे, पोळी व शेपूट असलेल्या सस्तन प्राण्याचे भान होते- तो प्राणी डोळयांसमोर येतो. तेव्हा भावबोध हे शब्दाचे मुख्य प्रयोजन होय.

*'अर्थगत्यर्थः शब्दप्रयोगः। अर्थसंप्रत्याययिष्यामीति शब्दः प्रयुज्यते[२७]।।*

*असे पतंजली आणि 'सर्वो हि शब्दोऽर्थप्रत्ययनार्थं प्रयुज्यते[२८]*

असे कुमारिल भट्ट यांनी नमूद केले आहे.

अर्थ : भर्तृहरीने अर्थाचे लक्षण पुढीलप्रमाणे सांगितले आहे :

*यस्मिंस्तूच्चरिते शब्दे यदा योऽर्थ : प्रतीयते।*

*तमाहुरर्थं तस्यैव नान्यदर्थस्य लक्षणम्।।वाक्य. २.३२९।।*

'शब्दाचा उच्चार होताच ऐकणाऱ्याला ज्या अर्थाची प्रतीती -अनुभूती होते, तो त्या शब्दाचा अर्थ होय. अर्थाचे याहून वेगळे कोणते लक्षण नाही.' शब्द आणि अर्थ याप्रमाणे परस्परांशी अन्वित-संबद्ध असतात. आपल्या मनातील भाव दुसऱ्याला समजावा, यासाठी बोलणारा शब्दाचा वापर करतो. संप्रेषण (communication) हे शब्दाचे नियतकार्य आहे. ऐकणाऱ्याला प्रथम ज्ञान होते, ते शब्दाचे व मागाहून अर्थाचे.

आता 'अर्थ' म्हणजे काय व त्याचे स्वरूप कसे असते, हे पाहू. शब्दार्थसंबंधाच्या दृष्टीने ते अगत्याचे आहे. बोलणारा शब्दाच्या द्वारा जो भाव, विचार व्यक्त करतो, तो मूर्त-अमूर्त, स्थूल-सूक्ष्म, गत-विद्यमान- भावी, वास्तविक-काल्पनिक, इ. कोणत्या तरी, कोणत्याही गोष्टीचा संभवतो. म्हणजे अशी वस्तू, बाब वा घटना आणि तिच्याशी संबद्धभाव, कल्पना किंवा विचार या दोहोंनाही अर्थ असे म्हणता येते. या संबंधात भर्तृहरी म्हणतात :-

*ज्ञानं प्रयोक्तुर्बाह्यार्थः स्वरूपं च प्रतीयते।*

*शब्दैरुच्चरितैस्तेषां सम्बन्धःसमवस्थितः ।।वाक्य. ३.३.१*

संभाषणात बोलणाऱ्याच्या आशयाचे- अर्थाचे ज्ञान, शब्दाचा बाह्यअर्थ आणि शब्दरूप या तीन गोष्टी प्रतीत होतात. शब्दांचा उच्चार झाला, म्हणजे त्यांचा एकमेकांशी



अनुक्रमणिका

असणारा संबंध स्थिर-निश्चित होतो. शब्दज्ञान, शब्दाचा बाह्यअर्थ–पदार्थ व शब्दरूप या तीन भिन्न बाबी आहेत, हा विचार येथे मांडला आहे. अर्थात हे वेगळेपण विश्लेषणाच्या पातळीवरील होय. तसेच, ते अर्थ विचाराच्या दृष्टीने महत्त्वाचेही आहे.

**द्विविध अर्थ :** 'अश्व घोडा' असा शब्द कानी पडला की पुढील तीन बाबींचा बोध होतो. १) शब्दाचा-ध्वनिरूपाचा बोध, २) अश्व–घोडा या पशूचा बाह्य अर्थाचा बोध आणि ३) वक्त्याच्या विवक्षेचा–आशयाचा बोध. अश्व हा शब्द (पद), उद्दिष्ट वस्तू (पदार्थ) आणि तन्मूलक विवक्षित असा वक्त्याचा विचार व ऐकणाऱ्याला येणारा प्रत्यय-अनुभव या तीन बाबी वस्तुतः भिन्न आहेत. असे असूनही एकीचा दुसरीवर आरोप केल्यामुळे त्या अभिन्न भासतात.[२९] शब्द व वस्तू (पद आणि पदार्थ) यांत अशी आरोपित, काल्पनिक एकात्मता मानून दोहोंसाठी एकच शब्द योजितात. " 'अश्व' शब्दाचा अर्थ कोशाच्या बाहेर तबेल्यात बांधून ठेवला आहे." असे जेव्हा विनोबा (भावे)[३०] म्हणतात, तेव्हा त्यांना बाह्य पदार्थ–घोडा हा पशू विवक्षित आहे, हे उघड आहे. "पण बोलणाऱ्याने आधी तो (अश्व) मनात बांधला, कल्पिला होता," असे यावर कोणी परिहासाने म्हटले, तर ते परम अर्थाने विचारात घ्यावे लागेल. अप्रत्यक्ष), अविद्यमान (भूत- भविष्यकालीन), अमूर्त, काल्पनिक (मृगजल, कल्पवृक्ष, आकाशपुष्प) अशाही गोष्टींचा बोध शब्दापासून होतो. याप्रमाणे अर्थबोध हा बाह्य व 'बौद्ध' वस्तुरूप आणि बुद्धिगम्य असा द्विविध असतो.

**शब्दार्थांची एकात्मता :** आपण विचार करतो, तो शब्दांच्या द्वारा. भाषेचा विचारावर मोठा प्रभाव पडतो. कारण विचार शब्दांनीच व्यक्त होतात. एखादा विचार दुसऱ्याला सांगण्याच्या वेळीच याचा अनुभव येतो, असे नाही; तर एखादा चांगलासा (वाटणारा) विचार, उत्कट भावना, अभिनव कल्पनाबंध स्फुरला असता, तो मनात साकार केल्याशिवाय, त्याला मनोमन शब्दरूप दिल्याशिवाय तो विशद झाला, असे स्वतःलाही वाटत नाही. याप्रमाणे भाषेला भाव, विचार, कल्पना यांचा आधार असतो आणि त्यांचा आविष्कार भाषेच्या– शब्दांच्या रूपाने होतो. असे ते परस्परांशी अविनाभाव संबंधाने जोडले गेले आहेत. 'वाङ् मे मनसि प्रतिष्ठिता, मनो मे वाचि प्रतिष्ठितम्।' - (हे परमात्मन्, तू प्रकट होऊन) माझी वाणी मनामध्ये प्रतिष्ठित होईल व माझे मन वाणीमध्ये प्रतिष्ठित होईल, असे कर.' अशी प्रार्थना ऐतरेय उपनिषदातील शांतिमंत्राच्या आरंभी केली आहे. वाणी व विचार, शब्द आणि अर्थ हे असे एकवटलेले आहेत. कालिदासाने पार्वतीपरमेश्वराचे–अर्धनारीनटेश्वराचे उपमान म्हणून 'संपृक्तवागर्थाची' 'रघुवंशा' च्या आरंभी (१.१) जी मार्मिक योजना केली. तीत हाच भाव व्यक्त होतो. शब्द आणि अर्थ हे आपाततः वरकरणी वेगळे वाटत असले, तरी 'एकस्यैवात्मनो भेदौ शब्दार्थावपृथक्स्थितौ।' (वाक्य. २.३१) - ते एका आत्म्याचे दोन भेद, एकाच तत्त्वाचे दोन आविष्कार, एकाच नाण्याच्या दोन बाजूंप्रमाणे एकत्रित असतात.

याप्रमाणे शब्द आणि अर्थ एकमेकांशी संलग्न, वेगळे न करता येण्याजोगे आहेत, असे वैयाकरण मानतात. त्यांनी शब्दार्थसंबंधात स्वीकारलेल्या अद्वैतभावाची परिणती शब्दब्रह्मात झाली, असे 'वाक्यपदीयाच्या पहिल्याच कारिकेवरून म्हणता येते.

*अनादिनिधनं ब्रह्म शब्दतत्त्वं यदक्षरम्।*

*विवर्ततेऽर्थभावेन प्रक्रिया जगतो यतः ।। वाक्य. १.१।।*

'शब्दतत्त्व ब्रह्म आहे. ते अनादी व अनंत आहे. ते नाशवंत नाही. त्या वाक्तत्त्वाचा अर्थाच्या स्वरूपात विवर्त–आभासात्मक बदल होतो. तेणेकरून जगातील सर्व प्रक्रिया निर्माण होतात.[३१] येथे शब्दब्रह्माचे अपरंपार महत्त्व सांगितले आहे. जगातील वेगवेगळे व्यवहार चालतात, ते या वाक्तत्त्वामुळे.'

'ब्रह्म' शब्दासह 'विवर्तते' हे (क्रिया-) पद आल्यामुळे बहुधा (प्रसिद्ध) शांकर वेदान्तातील विवर्ताला (=भ्रम, आभास, माया, मिथ्याप्रतीती – असा अर्थ) धरून कित्येकांनी या कारिकेचा अर्थ केलेला दिसतो.[३२] विवर्तवादाच्या अनुरोधाने केलेले शब्दार्थसंबंधक विवरण अध्यात्मात पर्यवसित होते. अर्थविज्ञानासारख्या लौकिक विषयाच्या संबंधात ते अप्रस्तुत ठरते.[३३] मीमांसक व नैयायिक यांनी शब्दब्रह्माचे–पर्यायाने स्फोट-कल्पनेचे खंडन केलेले आहे.

**शब्दार्थसंबंध :** हा संबंध नित्य, की अनित्य, या वादात मात्र वैयाकरण व मीमांसक यांचे मत जुळणारे दिसते. शब्द ऐकल्यावर अर्थाचा बोध होतो, तो त्या दोहोंत काही संबंध असतो, म्हणून. तसे नसते, तर 'सर्वे सर्वार्थवाचकाः।' या उक्तीप्रमाणे सर्व शब्द सर्व अर्थाचे बोधक झाले असते. पण तसे न होता शब्दापासून काही ठरावीक अर्थाचा बोध होतो, हे आपण पाहतो. अर्थाचा बोध करण्याची शक्ती शब्दात अनादी कालापासून चालत आलेली दिसते. कात्यायनाने आपल्या 'वार्तिका' त 'सिद्धे शब्दार्थसम्बन्धे।[३४] नित्यो ह्यर्थवतामर्थैरभिसम्बन्धः।' असे म्हटले असून, पतंजलीने 'लोकतः'[३५] हा त्याचा आधार नमूद केला आहे. लोक आपापले भाव प्रकट करण्यास व कार्य साधण्यास भाषेत आधीच प्रचलित असलेल्या (अर्थयुक्त) शब्दांचा उपयोग करतात. शब्द नसला, तर त्यासाठी कोणी वैयाकरणाकडे धाव घेत नाही. आपणांस शब्दार्थाचे ज्ञान होते, ते लोकव्यवहारावरून. हा संबंध कोणी केव्हा जुळविला, हे सांगता येत नाही. दृष्टीच्या ठिकाणी वस्तू- तिचे रूप पाहण्याची शक्ती जशी स्वाभाविक-अनादिकालसिद्ध आहे. तशी नियत अर्थाचा बोध करण्याची शक्ती शब्दाच्या ठायी आहे, असे वैयाकरणांचे[३६] मत आहे. तथापि, इंद्रिय व विषय यांचा संबंध जसा साक्षात आहे, तसा हा नाही. अर्थाचा बोध करण्याची योग्यता तेवढी येथे प्रस्तुत दिसते.

दोन गोष्टींतील संबंध विविध प्रकारे दाखवता येतो. वर सांगितलेला योग्यता संबंध हा स्वाभाविक प्रवृत्तीवर आधारलेला आहे. अमुक शब्दाचा अमुक अर्थ अथवा अमुक अर्थाचा अमुक शब्द म्हणण्यात स्व-स्वामिभाव संबंध दिसतो. शब्द व अर्थ यांच्या





अनुक्रमणिका

स्वरूपासंबंधाने मागे जे विवेचन केले, त्याच्या अनुरोधाने त्यांच्यांत कार्यकारण संबंध स्थापणारे भर्तृहरीचे मत लक्षणीय ठरते. ते असे :

*शब्दः कारणमर्थस्य स हि तेनोपजन्यते।*

*तथा च बुद्धिविषयादर्थाच्छब्दः प्रतीयते।। वाक्य. ३.३.३२।।*

'शब्द अर्थाचे कारण आहे आणि तो (अर्थ) त्या (शब्दा-) मुळे निष्पन्न होतो. (त्याचे कार्य ठरतो.) त्याचप्रमाणे बुद्धीचा विषय झालेल्या (सूक्ष्मबुद्धिस्थ) अर्थापासून शब्दाची प्रतीती होते. याप्रमाणे शब्द व अर्थ यांची एकमेकांपासून उपलब्धी होते. त्या दोहोंत असा परस्परसापेक्ष कार्यकारणसंबंध असतो.

**'दर्शनां' तील विचार :** वैयाकरणांप्रमाणे मीमांसकही शब्दार्थसंबंध नित्य आणि स्वाभाविक मानतात. "औत्पत्तिकस्तु शब्दस्यार्थेन सम्बन्धः" असे जैमिनीने 'मीमांसासूत्रा'त (१.१.५) म्हटले असून, त्यावर "औत्पत्तिकमिति नित्यं ब्रूमः। उत्पत्तिर्हि भाव उच्यते लक्षणया। अवियुक्तः शब्दार्थयोर्भावः सम्बन्धः। नोत्पन्नयोः पश्चात्सम्बन्धः।" असे शाबरस्वामींचे भाष्य आहे. म्हणजे ज्यांना एकमेकांपासून अलग करता येत नाही, अशा गोष्टींतील हा संबंध होय. शिवाय, हा संबंध सांकेतिक मानला, तर मीमांसकांच्या मते त्यात अनेक अडचणी उत्पन्न होतात. शब्दार्थसंबंध अनादी आणि अपौरुषेय आहे, ही धारणा मीमांसकांच्या वेदप्रामाण्याला धरून आहे.

शब्दाची अर्थबोधकता सर्वांना मान्य असली, तरी अर्थबोध करण्याची त्याची शक्ती नित्य व स्वाभाविक असते. याविषयी मतभेद आहेत. बौद्ध व वैशेषिक ही दर्शने शब्दप्रामाण्य मानणारी नाहीत. प्रत्यक्ष व अनुमान या प्रमाणांनी ज्ञात होणाऱ्या अर्थाचा वाचक (बोधक) एवढेच त्यांच्या लेखी शब्दाचे महत्त्व. ही दोन दर्शने शब्दाला प्रमाण मानत नसली, तरी त्याची कारणे वेगवेगळी आहेत.

बौद्ध बाह्यवस्तूचे अस्तित्व (बाह्यार्थ) मानत नाहीत. विवक्षेचे- बोलणाऱ्याला जे म्हणायचे आहे, त्याचे अनुमान करून देणे, हेच त्यांच्या मती शब्दाचे प्रयोजन असते. शब्दाचा संबंध केवळ आंतर- मनोगम्य अर्थाशी असतो; आणि तोदेखील 'अतद्व्यावृत्तीने[३७] म्हणजे अभावात्मक होय.' हा अभाव अर्थात मनःकल्पित-वैचारिक पातळीवरचा असतो. 'गाय' किंवा 'घोडा' असा शब्द ऐकल्यावर तदितर गोष्टीच्या अभावाची कल्पना मनात येते. ('तद्भिन्नत्यागः') हे अपोहवाद[३८] म्हणून प्रसिद्ध असलेले बौद्धांचे मत होय. ते व्यवहार व मानसशास्त्र या दोहोंशी जुळणारे नाही.

याउलट, वैशेषिक बाह्य वस्तूची सत्ता (अस्तित्व) मानतात व शब्दाचा अर्थाशी संबंध कल्पितात. तथापि, हा संबंध एकात्म स्वरूपाचा व स्वाभाविक नाही, असे त्यांना वाटते. पूर्व व उत्तर पक्ष मांडून आचार्य कणादाने आपले मत प्रतिपादिले आहे. 'शब्दार्थौ असम्बद्धौ' शब्द व अर्थ यांत संबंध नसतो, म्हणजे त्यांच्यामध्ये संयोग किंवा समवाय यांपैकी कोणताही अनुबंध नसतो, असे पूर्वपक्षाचे मत उद्धृत करून मग 'सामयिकः





अनुक्रमणिका

शब्दादर्थप्रत्ययः।'[३९] असे सिद्धान्त-सूत्र मांडले आहे. 'समया' मुळे, 'संकेता'धारे शब्दाच्या अर्थाचा प्रत्यय येतो, त्याचे भान होते.

**संकेत :** प्रस्तुत विषयाच्या दृष्टीने वरील सिद्धान्तसूत्र महत्त्वाचे आहे. शब्दापासून होणारी अर्थाची प्रतीती सामयिक किंवा सांकेतिक असते. सारखी पदयोजना असणारे 'सामायिकत्वाच्छब्दार्थसम्प्रत्ययस्य'[४०] हे नैयायिक गौतमाचे मत वैशेषिक कणादाच्या मताशी जुळणारे आहे. शब्द आणि अर्थ यांना जोडणारा दुवा किंवा अनुबंध म्हणजे संकेत. दोन्ही सूत्रांत 'समय' हे पद आले असून, वात्स्यायनाने न्यायसूत्रावरील भाष्यात 'अस्य शब्दस्येदमर्थजातमभिधेयमित्यभिधानाभिधेयनियमनियोगः' या शब्दाचे हे अर्थ (वाच्य) होतात, असा अभिधान-अभिधेय अथवा वाच्य-वाचक नियम म्हणजे 'समय'- असे त्याचे विवरण केले आहे. एवंच, शब्दार्थसंबंधांत समय किंवा संकेत म्हणजे सर्वांची-बहुतांची एक समजूत, संमती वा सामंजस्य. अशा लोकमान्यतेला इंग्रजीत (Convention) म्हणतात.

'शक्तं पदम्।अस्मात्पदादयमर्थो बोद्धव्य इतीश्वरेच्छारूपसंकेतःशक्तिः।' अर्थबोधक शक्तीने युक्त ते पद. या पदापासून या अर्थाचा बोध व्हावा, असा ईश्वरेच्छारूप संकेत म्हणजे शब्दाची बोधकशक्ती' असे सांगून नैयायिकांनी संकेताचे कर्तृत्व ईश्वराकडे दिले आहे. आपण मानव वेगवेगळ्या वस्तूंना आणि व्यक्तींना स्वेच्छेने किंवा सकारण विविध नावे ठेवतो-देतो. ती अर्थबोध करतात. बहुधा असा लोकव्यवहार लक्षात घेऊन नव्यनैयायिकांनी 'इच्छामात्रं संकेतः।' संकेत (लोकांच्या) इच्छेप्रमाणे ठरतो-असे त्याचे स्वरूप सांगितले आहे.

शब्दार्थसंबंध नित्य आहे, असे वैयाकरण व मीमांसक यांच्याप्रमाणे नैयायिकही मानतात. उलट, तो (संकेताश्रित म्हणून) अनित्य आहे, असे वैशेषिक आणि नव्य नैयायिक यांचे मत दिसते.

या दुसऱ्या मतानुसार शब्दार्थसंबंध अनित्य, परिवर्तनशील ठरतो. शब्दात व त्याच्या अर्थात परिवर्तन होत असले, तरी तरी ते दोन्ही बरेच स्थायी आहेत. या संबंधात अशी सापेक्ष स्थिरता नसली, तर साऱ्या गोष्टी (सारा वाग्व्यहार) निरर्थक झाल्या असत्या. पण जुने ठेवणे सोडायला समाज सहज तयार होत नाही. तो ते शक्य तोवर सांभाळतो. जुने संस्कार व आधीचे अनुभव स्मृतिरूपाने मनात राहतात. ते पूर्णपणे जात नाहीत.

बोलणारा व ऐकणारा यांना लोकव्यवहारावरून शब्दार्थसंबंधाचे ज्ञान होते. संकेत 'लोकतः' उमजला, म्हणजे शब्द व अर्थ यांतील वाच्य- वाचक संबंधाचे भान होते. शब्दाच्या ठायी असणाऱ्या अर्थबोधकतेला शक्ती, वृत्ती, व्यापार ही पर्यायी नावे आहेत. यामुळे शब्द अर्थबोधक शक्तीने युक्त–अर्थवान, सार्थ होतो. वडील मंडळीचे बोलणे ऐकून लहान मुले शब्दार्थ शिकतात. उदा., 'गाय आण', असे जेव्हा आजोबा मुलाला





अनुक्रमणिका

सांगतात, तेव्हा आपले वडील (गोठ्यातून) गाय आणतात. हे पाहणाऱ्या छोट्या नातवाला 'गाय' व 'आण' या पदांचा अर्थ समजतो.

'इच्छामात्रं संकेतः' या उक्तीमधील संकेत एकट-दुकट व्यक्तीचा असून भागणार नाही. तो सामूहिक, सामाजिक, प्रादेशिक अशा व्यापक स्वरूपाचा असला पाहिजे. संकेत हा विवक्षेप्रमाणे–इच्छेला येईल तसा अथवा व्यवहारात (धात्वर्थाने नव्हे, तर) शिथिलपणाने ज्याला 'मनःपूत'-मनाला वाटेल तसा (arbitrarily) ठरलेला, स्थिरावलेला असतो. कालान्तराने तो लोकसमुदायात रूढ होतो आणि मान्यता मिळवतो. मूलतः एखादी कल्पना व्यक्त करण्यास अमुकच शब्द का योजिला अथवा एका विशिष्ट शब्दातून एक विशेष भाव वा विचार का निष्पन्न झाला, याचे काही मर्यादेपलीकडे कारण सांगता येणार नाही. व्यवहाराच्या सोयीसाठी समाजात असा काही संबंध, संकेत ठरविणे, स्थिरावणे अगत्याचे असते. चार पायांच्या, खूर, आयाळ व लांब केसांचे शेपूट असणाऱ्या, पण शिंगे व वशिंड नसलेल्या पशूला (सं.घोटः घोटकः) - 'घोडा' हे नाव पडण्याचे निश्चित, सयुक्तिक कारण सांगता येणार नाही. संकेताचे स्वरूप असे अतात्त्विक आहे. तथापि, व्यवहाराच्या सोयीसाठी त्या प्राण्याला काही तरी म्हणणे, कोणते तरी नाव देणे आवश्यक आहे. तेव्हा अशा प्राण्याचा या प्रकारच्या प्राण्यांत सामान्यत्वे आढळणाऱ्या साऱ्या वैशिष्ट्यांसह त्याच्या जातीचाही-बोध व्हावा, म्हणून कोणी तरी घोडा हा शब्द योजिला व तो रूढ झाला. याप्रमाणे घोडा या प्राण्याचा-वस्तूचा- पदार्थाचा संकेताला धरून अर्थबोध करणारा 'घोडा' शब्द त्याचे ध्वनिरूप किंवा वर्णचिन्ह होय.

प्राचीनांच्या शब्दार्थ विचाराची त्यांच्याच वचनाधारे ही पूर्वपीठिका संक्षेपाने व स्थूलरूपाने मांडली आहे. त्यांनी केलेले विवेचन जसे लक्षणीय आहे, तसेच, त्यांचे मतभेद विचाराला चालना देणारे व विविध पैलूंचे निदर्शक आहेत.

भाषा ही शब्दघटित असली, तरी आपला सारा वाग्व्यहार चालतो, तो प्रायः वाक्यांच्या द्वारा. म्हणूनच वैयाकरणांनी वाक्यस्फोटाला प्राधान्य दिले आहे. मीमांसक आणि नैयायिक यांनीही वाक्यविचाराचे परोपरीने विश्लेषण–विवेचन केलेले आहे. हा भाग उद्‌बोधक व अभ्यसनीय असला, तरी लेखकाने मर्यादेचे भान ठेवले पाहिजे.

**लेखनालंकार**

तळटीपा

(केवळ स्थळ - निर्देश सलग दिले आहेत.)

१) महाभारत, वनपर्व २.१९

२) कुमारिल भट्ट, श्लोकवार्तिक १३

३) ऋग्वेद, १.१२५.१ ते ८

४) ऋ. ८.१००.११.

५) ऋ. ४.५८.३,

५+) महाभाष्य, आ. १, पृ.६-७,

६) ऋ. १६४.४५ (मंडल, सूक्त, ऋचा या क्रमाने.)

७) वेद हे जगातील श्रेष्ठ व प्राचीनतम ग्रंथ होत. शब्दरूप वेद म्हणजे शब्दब्रह्म अशी आपली धारणा आहे. प्रत्यक्ष व अनुमान यांच्याप्रमाणे न्याय, मीमांसा (पूर्व व उत्तर=वेदान्त) ही दर्शने 'शब्द' हेही एक प्रमाण मानतात. वेदप्रमाण्यालाच शब्दप्रामाण्य असे म्हणतात. तेव्हा प्रमाण शब्दाचा यथार्थ आशय समजायचा, तर शब्दाचे संपूर्ण-निःशेष ज्ञान आवश्यक आहे. या जाणिवेतूनच प्राचीन भारतात शब्दार्थ-मीमांसेचा उगम झाला. पूर्वमीमांसा हे आस्तिक दर्शन मुख्यतः या स्वरूपाचे आहे.

८) निरुक्त, १०२

९) निरुक्त, १.१

१०) 'अथ चेत् सर्वाणि आख्यातजानि नामानि स्युः।' यकश्च तत्कर्म कुर्यात् सर्वं तत् सत्त्वं तथाचक्षीरन्। यः कश्चाध्वानमश्नुवीत अश्व : स वचनीयः स्यात्। यत् किंचित् तृन्द्यात् तृणं तत्''। निरुक्त, १-१२(२). अश्व आणि तृण या नामांचे क्रमशः अश्=व्यापणे, आक्रमणे व तृद् = घुसणे, भंगणे हे धातू मूळ मानले आहेत.

११) 'अथापिचेत् सर्वाणि आख्यातजानि नामानि स्युः।' यावद्भिर्भावैः सम्प्रयुज्येत तावद्भ्यो नामधेयप्रतिलाभः स्यात्। तत्रैवं सति स्थूणा दरशया च आसञ्जनी (संजनी) च स्यात्''॥ निरुक्त, १-१२(३) सरळ उभा म्हणून (खांबाला) 'स्थूणा' म्हणायचे, तर खड्ड्यात रोवलेला, स्थिरावलेला म्हणून 'दरशया' व तुळईला आधार म्हणून '(आ) संजनी' असेही म्हणता यावे. येथे क्रमशः स्था=उभा, स्थिर असणे, राहणे, दर्+शी=निजणे, पहुडणे आणि आ + ✓ संज्=संलग्न असणे, बांधून ठेवणे हे धातू मूळ मानले आहेत.

१२) 'यः कश्चन तत् कर्म कुर्यात् सर्वं तत् स्वत्त्वं तथाचक्षीरन् इति पश्यामः समानकर्मणां नामधेयप्रतिलम्भमेकेषां, नैकेषाम् यथा तक्षा परिव्राजको जीवनो भूमिज इति। निरुक्त १.१४ तक्षा-लाकूड कापणारा, तासणारा; परिव्राजक- भटकणारा, फिरस्ता हे शब्द क्रमशः ✓ तक्ष्, परि + व्रज् या धातूंपासून बनले आहेत. पण लाकूडतोड्याला सुतार म्हणत नाहीत. परिव्राजक ही संज्ञा केवळ संन्याशाला लावतात. तसेच जीवन=पाणी, भूमिज=मंगळ ग्रह.

१३) (कक्ष=घोड्याची काख) तत्सामान्यान्मनुष्यकक्षः। बाहुमूलसामान्यादश्वस्य। निरुक्त, २.२

पशुपादप्रकृतिः प्रभागपादः प्रभागपादसामान्यादितराणि पदानि, नि.२.७ यात





अनुक्रमणिका

अर्थविस्ताराचे साम्य, सादृश्य हे कारण आले आहे. (पशूच्या (चार) पादांपैकी एक चतुर्थांश भाग पाद > पाव्)

१४) सूर्यमस्या वत्समाह साहचर्यात्। सूर्य हा हिचा मुलगा असे साहचर्याने म्हटले आहे. (हिचा=उषेचा पाहा-ऋ. १.११३.२)

१५) शवति गतिकर्मा कम्बोजेषु भाषते, नि. २.२ कंबोज देशातील लोक 'शव्' धातूचा गत्यर्थक उपयोग करतात. ✓ शव=जाणे, बदलणे इतरत्र शव=प्रेत.

१६) एकार्थमनेकशब्दमित्येतदुक्तम्। नि., ४.१ भीमः भीष्म गिरिः पर्वतः नि. १.२०

१७)ऋष-नक्षत्र, अस्वल, गौ-गाय, पृथ्वी, बाण, किरण. नि. २.५.६ पद पाद नि. २.७, वराह-मेघ, पर्वत, शूकर (रानडुक्कर) नि. ५.४

१८) काकः इति शब्दानुकृतिः। तदिदं शकुनिषु बहुलम्,नि. ३.१८

१९) अथापीदमन्तरेण मंत्रेष्वर्थप्रत्ययो न विद्यते। नि. ३.१४

२०)न तु पृथक्त्वेन मंत्रा निर्वक्तव्याः। प्रकरणशः एव निर्वक्तव्याः। नि. १३.१२

२१) तीव्रार्थतरमुदात्तमल्पीयोऽर्थतरमनुदात्तम्। नि. ४.२५.

२२) वृत्राच्या वडिलांनी-त्वष्ट्याने एक यज्ञ केला, तो मुलाच्या हातून इंद्राचा नाश व्हावा या हेतूने. 'इन्द्रशत्रुर्वर्धस्व'- वाढू द्या इन्द्रशत्रू-म्हणजे इंद्राचा संहारक. या अर्थी षष्ठी तत्पुरुष होण्यासाठी अन्तोदात्त स्वरयोजना करायला हवी होती. पण ऋत्विजांनी आद्याक्षर उदात्त स्वरात उच्चारिले. त्यामुळे 'इंद्रशत्रु' असा बहुव्रीही समास होऊन 'इंद्र आहे संहारक ज्याचा' असा अर्थ निघाला. पुढे इंद्राने वृत्राला ठार केले.

२३) या सिद्धान्तवाक्याचा म.म.अभ्यंकर यांनी व्या. महाभाष्य अनुवादात केलेला उलगडा- ''तर मग येथे ही शब्द नित्यच आहे. (तो काही उच्चारणप्रक्रियेने उत्पन्न होत नाही.) उच्चारण प्रक्रियेने उत्पन्न जो ध्वनि, तो त्या नित्य शब्दाचा व्यंजक आहे. ध्वनि आणि स्फोट (म्हणजे मूळचा नित्यशब्द असे शब्दांचे दोन प्रकार आहेत. (मूळ ध्वनीने व्यक्त होणारा) मूळचा नित्यशब्द सर्वत्र एकस्वरूपाचाच आहे.'' पृ.४४५ या आधी पूर्वोल्लेखित ''चत्वारि शृंगा त्रयो अस्य पादा'' या ऋचेतील 'द्वे शीर्षे' या पदबंधावरील महाभाष्य 'द्वौ शब्दावात्मानौ नित्यः कार्यश्च' असे असून त्याचा अनुवाद 'दोन मस्तके म्हणजे शब्दाची दोन स्वरूपे नित्य व उत्पाद्य; (तळटीपेत) नित्य म्हणजे स्फोटरूपी शब्द आणि उत्पाद्य म्हणजे स्फोटाचा ध्वनि'' असा केला आहे. तत्रैव, पृ. ६.७

*२४) लब्धक्रियः प्रयत्नेन वक्तुरिच्छानुवर्तिना।*
*स्थानेष्वभिहतो वायुः शब्दत्वं प्रतिपद्यते।। वाक्य १.१०८*

२५) "वैयाकरणमती शब्द नित्य आहे आणि अर्थ त्या नित्य शब्दालाच आहे. त्या नित्य शब्दालाच 'स्फोट' असे म्हणतात. त्या स्फोटाची उत्पत्तीही होत नाही आणि नाशही होत नाही. मनुष्य बोलू लागला, म्हणजे फक्त त्या वेळी त्या ध्वनीने तो स्फोटरूपी नित्य शब्द प्रकाशित होतो; आणि श्रोत्यांच्या मनामध्ये आपला अर्थ आणून देतो". व्या. महाभाष्य, पृ. २ वरील तळटीप.

२६) तत्रैव-पृ.२.

२७) तत्रैव - पृ. २६४.

२८) मीमांसासूत्रे, १.३.८ वरील वार्तिक

२९) हे अध्यासाने होते, असे पतंजलीने 'योगसूत्रे' नावाच्या ग्रंथात म्हटले आहे. 'शब्दादर्थप्रत्ययानामितरेतराध्यासात्संकर : त्यावरील भाष्य –

'गौरितिशब्दो गौरित्यर्थो गौरितिज्ञानम्। य एषां प्रविभागज्ञः स सर्ववित्।

अध्यास म्हणजे अवास्तविक, आरोपित एकता. उदा., अपुऱ्या प्रकाशात दोरीच्या ठायी सर्पाचा होणारा भास.

३०) 'मधुकर' (विनोबांचा लेखसंग्रह)

३१) 'सर्वदर्शनसंग्रहा' च्या मराठी अनुवादातील डॉ. कंगले यांचे विवरण 'जगाचे मूल कारण जो 'स्फोट' नावाचा अवयवरहित नित्य शब्द, तो ब्रह्मच आहे. आदि व अन्त नसलेले, विक्रियारहित ते शब्दाचे तत्त्व म्हणजे ब्रह्म. त्याच्यापासून पदार्थाच्या स्वरूपात जगाची क्रिया विवर्तित होते.' पृ. ३३९

३२) पुण्यराजाची पहिल्या कारिकेवरील टीका- तिचा डॉ. कपिल देव द्विवेदी यांनी केलेला अनुवाद पाहा. 'अर्थविज्ञान और व्याकरण दर्शन, पृ. ६२, ३९७.

३३) डॉ. सत्यप्रकाश वर्मा यांना या संबंधातील 'विवर्त' मान्य नाही.

'भर्तृहरि का शब्दब्रह्म ठोस रूपमें वैज्ञानिक आधारपर स्थित है। उसे दर्शनब्रह्म का छायाभास मात्र नहीं कहा जा सकता।

डॉ. वर्मा, भाषातत्त्व और वाक्यपदीय, पृ. १२

३४) 'शब्द व त्याचा अर्थाशी संबंध नित्य असताना– असा विग्रह करावयाचा. कारण शब्दाचा म्हणजे वाचकाचा (बोधक पदाचा) अर्थाशी संबंध (ज्याला शक्ति म्हणतात, तो) नित्य असतो. (तळटीपेत) अर्थ म्ह. पदार्थ जरी अस्तित्वात नसला, तरी अर्थ दाखविण्याची योग्यता शब्दामध्ये कायमच आहे.' महाभाष्य, पृ. १७

३५) 'लोकतः' - लोकव्यवहारावरून समजते. लोकांमध्ये निरनिराळे अर्थ मनात घेऊन निरनिराळ्या शब्दांचा प्रयोग करतात. तत्रैव, पृ. १७

३६) कौंडभट्ट, वैयाकरणभूषणसार, कारिका ३७

३७) अतद्व्यावृत्ति = अपोह (अप+ऊह)- 'जे ते नाही, त्याचा अभाव.

व्यावृत्ती म्हणजे वगळणे. 'आपण बोलतो, त्या वस्तूच्या निषेधाच्या निषेधातून वस्तूचे ज्ञान होते. म्हणजे अर्थ हा निषेधाचा निषेध होय." डॉ, सु. शि. बारलिंगे, मराठी-तत्त्वज्ञान-महाकोश, खंड २, पृ. ४१८

३८) वैशेषिक सूत्रे, ७.२.१८

३९) तत्रैव, ७.२.२०

४०) न्यायसूत्रे, २.१.७

(विदर्भ संशोधन मंडळ, वार्षिक, १९६८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या लेखाचे पुनर्लेखन)

**एचु १/४४४, लक्ष्मीनगर, महाराष्ट्र गृहनिर्माण परिसर, पर्वतीलगत, पुणे ४११००९.**



---

**संन्याशाची विचित्र मागणी**

इटालियन भाषेत बायकोला 'मोल्लिए' आणि ब्लँकेटला 'माल्लिये' म्हणतात. 'मोल्लिए' आणि 'माल्लीये' या शब्दात भेद करता न आल्यामुळे माझ्या एका मित्राची फजिती झाली होती. नोव्हेंबरचा महिना होता. थंडीचा जोर वाढला होता म्हणून दोन ब्लँकेटे मागण्यासाठी तो मेट्रनबाईकडे गेला. त्यांचा संवाद असा रंगला;

"व्होर्रेई आवेरे दुए मॉल्लिये" (मला दोन बायका हव्यात)

"पेरके" (कशासाठी)

"पेरके सेंतो मोल्तो फ्रेददो!" (कारण खूप थंडी वाजतेय)

थंडी लागते म्हणून बिचाऱ्याने, स्वत: संन्याशी असताना, दोन ब्लँकेटऐवजी दोन बायकांची मागणी केली होती.

**(संदर्भ : 'ओॲसिसच्या शोधात' फादर फ्रान्सिस दिब्रिटो पृ. ६४)**

# भाषा : घरची आणि दारची

सुमन बेलवलकर

एकोणिसाव्या शतकातली गोष्ट. साहेबाचा 'अंमल' जरा जास्तच होता. एक मराठी तरुण विलायतेला बालिष्टर व्हायला गेला होता. येताना पदवी आणि गोरी बायको घेऊन आला. वास्तविक मडमेला बायको करून आणली, म्हणून त्याच्या पदवीचे वजन जरा वाढलेच होते. पण त्याच्या आजीने त्याला बाजूला घेऊन विचारले,

''अरे, तुला विंग्रजी येते, ते ठाऊक आहे मला; पण नवऱ्याने बायकोशी बोलायचे विंग्रजी शिकलायस का तू?''

आजीबाईंच्या शंकेवरून एक गोष्ट स्पष्ट होते, की अनेक व्यवहार करता येतील, अशी एखादी भाषा शिकून घेतली, तरी; घरगुती, खास आतली म्हणून एक भाषा असते. परकी भाषा शिकताना ती 'आतली' भाषा आत्मसात करणे एखाद्या रिचर्ड बर्टनसारख्या खनपट्याला साधते. अन्यथा हा 'घरची' आणि 'दारची' असा भेद माणसाच्या स्वभाषेच्या संदर्भात असतो, हे उघड आहे.

भाषाविज्ञानात भाषेचे औपचारिक आणि अनौपचारिक असे ठळक भेद पाडलेले आहेत. साधारणपणे आपण बाजारात दुकानदाराशी, व्यवसायात सहकाऱ्यांशी वगैरे ही भाषा बोलतो. सकाळच्या वर्तमानपत्रापासून रात्रीच्या बातम्यांपर्यंत सर्व प्रसार-माध्यमांतून हीच भाषा आपल्या कानांवर पडते. अगदी घरातही दार उघडून कोणा परक्याला घरात घेतले, की तीच भाषा घरात शिरते. ही भाषा साधारण एका रंगाची, एका चेहऱ्यामोहऱ्याची असते. शिक्षणाच्या मदतीने तिचे उच्चार, व्याकरण, वाक्यरचना ह्या नियंत्रित केलेल्या असतात. 'चांद्यापासून बांद्यापर्यंत' सर्व मराठी माणसांचे भाषाविषयक व्यवहार सुरळीत व्हावेत, म्हणून तिचे असे स्वरूप असणे आवश्यक असते. व्यापक, विस्तृत संपर्काची ही भाषा म्हणजे औपचारिक भाषा. सर्वनामांत 'आपण', 'येथे थुंकू नये, कायदेशीर इलाज केला जाईल' किंवा 'आपण आपल्या लेकी, सुना व इष्ट मैत्रिणींसह अवश्य येऊन वधूवरांस शुभाशीर्वाद द्यावा. कार्य सिद्धीस नेणेस श्री समर्थ आहे' असे तिचे लेखी रूप सर्वांच्या परिचयाचे असते. बोलताना ही आपण 'छे छे! त्यात कसला त्रास. साधा शेजारधर्म आहे हा!' असे उपचार म्हणतो. म्हणायचे असते, ते मनातल्या मनात दातओठ खात उच्चारतो.

औपचारिक भाषा जर सर्वांसाठी एक असते, तर मग अनौपचारिक भाषा कोणती? महाराष्ट्रापुरते बोलायचे, तर बाहेर मराठी बोलणाऱ्यांची घरची भाषा तमिळ, तेलुगू, गुजराती अशी कोणतीही प्रादेशिक भाषा असेल. कोकणी, सातारी, अहिराणी अशी बोली असेल. मराठीचे पोटभेद म्हणून पुस्तकात दाखवलेल्या प्रकारात सापडणार नाही, अशी एखाद्या व्यवसायाची, वस्तीची, जमातीची बोली असेल. इतकेच काय, जिथे प्रमाणभाषा हीच घरातली भाषा असेल, तिथेही घराघरागणिक 'घरची' वेगळी भाषा निर्माण होते; जपली-जोपासली जाते. याचेही कारण पुन्हा भाषिक गरज!

अनौपचारिक भाषा आणि घरची भाषा किंवा अधिक चांगला शब्द वापरायचा, तर 'घरगुती भाषा' यांतले अंतर इथे स्पष्ट होते. घरची भाषा हे दोन माणसांचे आतले वर्तुळ, फक्त 'आपलं-तुपलं' जग निर्माण करते. वर्तुळाबाहेरच्याला त्यात प्रवेश नसतो. तीन भावंडांतही दोन भावंडं तिसऱ्याला कटवण्यासाठी आपले बेत रचतात, ते या भाषेत. एकदा अर्थनिश्चिती झाली, की मग कोणाहीसमोर बिनधास्तपणे बोलता येते, हा घरच्या भाषेचा फायदा असतो.

एक आई आणि तिची दोन मुलं आहेत. दोघांना साबूदाणा प्रिय, एकाला खीर, दुसऱ्याला खिचडी, आईनं खायला काय करू, म्हणून विचारलं, की एकानं म्हणायचं 'ऱ्हस्व' आणि दुसऱ्यानं 'दीर्घ'. त्यावरून भांडणं. ही त्या आईनं सांगितलेली गोष्ट.

ऱ्हस्व आणि दीर्घ हे फक्त संकेत (code words) नाहीत. मूळ शब्दाशी त्याचा प्रत्यक्ष संबंध आहे. सांकेतिक भाषेत आणि घरच्या भाषेत हाच फरक आहे. सांकेतिक भाषेत मूळ अर्थाशी संबंध नसलेले शब्द दिलेले असतात. मूळ वाक्य/शब्द एक आणि त्याचा अर्थ अगदी दूरचा, असेच ते असते. संकेतांच्या गुप्ततेसाठी ते आवश्यकही असते. गरुड, राणी, टायगर किंवा ऑपरेशन ब्लू स्टार यांचा अर्थ सैन्याच्या अगर तस्करांच्या गुपितांमध्ये असतो. घरच्या भाषेचे तसे नाही. माणूस वाढत वाढत, अनुभव घेत घेत आपले शब्दसंकेत तयार करत असतो. म्हणून तर व्याकरणातले सगळे काळ आणि रचना प्रत्येकाला येत असल्या, तरी काही माणसे काही रचनाच पुन्हा पुन्हा वापरताना दिसतात. एक कार्यवाह कायम अनिश्चित भविष्यकाळ (बघू, होईल) वापरतात आणि तृतीय श्रेणी कारकून देण्यात आले, करण्यात आले (म्हणजे स्वतः केले नाही), असे बोलतात.

माणसाची 'घरची' भाषा प्रथम त्याच्या आईशी सुरू होते. इवान इलिचने औपचारिक भाषेला 'डब्याच्या दुधाची' आणि घरच्या भाषेला 'आईच्या दुधाची' उपमा दिली आहे. बाळाची आंघोळ तीच असली, तरी प्रत्येक आई-बाळाची ती थोथो, भुडुश, शंभो, हडोमगंगे काहीही असू शकते. मूलही आपली जीभ चालवून शब्द बनवत असते. ओला हरभरा आणि सोलाणा या दोन शब्दांमधून 'हरभाणा' असा शब्द माझी भाची वापरते. हीच भाषा पुढे सवंगडी, पट्ट मित्रमैत्रिणींबरोबर तयार होते. प्रेमात पडल्यावर जनसमूहात किंवा लग्नानंतर वडीलधाऱ्यांपुढे वापरायला ह्या घरगुती भाषेचा खास

कप्पा बनवला जातो. मामला फक्त 'ज्याच्या त्याला कळति खुणा' असा असतो. म्हातारपणी याच भाषेने नातवंडांशी दोस्ती होत आईबाबांना लपवून गुपितं साठवली जातात. घरच कशाला, विजय मर्चंट जेव्हा विजय हजाऱ्यांबरोबर क्रिकेटच्या मैदानावर मोठ्याने गुजराती बोलायचे, तेव्हा ती असायची असलीच खास भाषा. घरच्या भाषेचं दोघांनी सुरू होणारं वर्तुळ, नातेवाईक, मित्र, आप्तगोत, गाववाले, आपल्या प्रांतातले आणि परदेशात अर्थातच देशबांधव असं विस्तारत जातं. ज्यांना समजू नये, अशांना दूर ठेवण्यासाठी, पण बिनदिक्कतपणे त्यांच्या पुढ्यात वापरायची भाषा, ती घरची भाषा.

आपल्याच कुटुंबाचं उदाहरण घेऊन ह्यातले काही मुद्दे इथं मला स्पष्ट करायचे आहेत. आमचं कुटुंब मूळ गोव्यातलं. पोर्तुगीजांनी बाटवायला सुरुवात केल्यावर देव आणि जीव घेऊन बरीच कुटुंबं रत्नागिरी जिल्ह्यात पळून आली. दैवज्ञ ब्राह्मण म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या जातीची वृत्ती ज्योतिष्याची आणि व्यवसाय सोनाराचा. पंचांग बघून मुहूर्त सांगणे, हरवलेल्या गाईचा शोध, मुंबईच्या चाकरमान्याचं न आलेलं पत्र यांविषयीचे प्रश्न बघण्याचे ज्योतिष माझे आजोबा करत असत. रत्नागिरीतल्या ज्या गावात थोडी जमीन आहे, तिथं अजून पोस्ट सुद्धा नाही. तीन पिढ्यांपूर्वी हे कुटुंब थोडंथोडं सांगलीत स्थलांतरित झालं. हे स्थलांतर जाळ्यासकट कबूतरांचा थवा उडावा, तसं नव्हतं. मुली देणं-करून आणणं अजूनही मूळ भूमीशीच चालतं. अलीकडे मी, माझे इंजिनीयर भाऊ गेली पंधरा वर्षं पुण्यात आहोत. आमचे कोकण-सांगली-पुणे हे स्थलांतर फक्त भौगोलिक नाही. व्यवसायात बदल झाले, राहणीत बदल झाला. कोकणी (मालवणी), कानडी आणि पुणेरी मराठी यांच्या प्रभावाखाली आम्ही राहिलो. तरीही आम्ही आमची घरची भाषा टिकवतो. कारण तीच आम्हांला एकमेकांशी जोडते. माझ्या पुण्याच्या मामाकडे वडलांचे मित्र एकदा आले होते. त्यांनी छोट्या मनूला विचारले,

'काय करतोय् तुझा बापूस?'

'गेलेत जमशेटपूरला...' असं उत्तर लगेच मिळताच ते खूश झाले.

कारण 'बापूस' हा वडलांचा उल्लेख पुण्यात जन्मलेल्या मुलीपर्यंत पोचला होता. मनूला पण ते आपल्या आजोबांसारखं बोलतात, म्हणून आपले वाटले.

घरची भाषा आणि दारची भाषा यांमधे व्याकरण, उच्चार आणि शब्दसंग्रह असा चढत्या श्रेणीत फरक असतो. प्रमाणभाषेत 'मुलांनो' मधला संबोधनाचा अनेकवचनी 'नो' कोकणात 'नु' होतो आणि तो आदरार्थी बहुवचनाला पण लावावा लागतो. तात्यानु, अण्णानु म्हटले नाही, तर 'रीत नाही' असा शिक्का बसतो. तोच दक्षिण महाराष्ट्रातून आज्ञार्थात. तिथे खा, जा न म्हणता खावा, जावा असं सवंचं बोलावं लागतं. एक कानडी मजूर साहेबाला आदरापोटी 'साहेबरे' म्हणाला. पण साहेबाला तो रे अरे तुरेतला वाटून दोघांची जुंपली. (मराठे आणि कन्नडिगेंना भांडायला काहीही

पुरतं!) पुण्याहून जरंड्याला जा किंवा जयसिंगपूरला–दादोबांच्या व्याकरणाचे तीनतेरा झालेले दिसतात. 'तिने शालू घेतला, कापड घेतलं' असले कर्मानुसारी भूतकाळ 'तिकडे पुण्यालाच ठेवा' म्हणून धुडकावले जातात. 'तू आंघोळ केलास काय, रे?' 'ते बबऱ्या अख्खा पगार उडिवलं, रे!' असा तिथे भूतकाळ सकर्मक असूनही कर्त्याच्या आहारी जातो. उच्चारभेदांसाठी केवळ कान टवकारले, तरी पुरे. 'ती फुलराणी' या हिशेबानुसार जगातल्या प्रत्येक भाषेत लिहिता येईल.

या सर्व व्यापारात शब्द फार महत्त्वाचे असतात. कारण दर्शनी भाषा तीच बोलूनही वेगळेपण दाखवायचे, तर ते शब्दांशिवाय कसे दाखवता येईल? सोनाराच्या घरी आलेल्या गिऱ्हाइकाला चहा द्यायचा असेल, तर तो कसा द्यायचा? मनापासून द्यायचा असेल, तर आग्रहाने! गिऱ्हाईक पटते आहे, असे दिसले, तर घरात सांगायचे 'झुळकवणी थाकव.' (झुळकवणीतून द्रव आणि थाकव–ठेवा सूचित होते.) आणि देखावाच करायचा, तर, 'जा, रे, नानाच्या हॉटेलात दोन स्पेशल सांगून ये.' याचा अर्थ ऐकणाऱ्याने गिऱ्हाईक गेल्यावरच परत यायचे, असा होतो. चहात दूध जरा जास्त टाकायला सांगायचे, तर 'जरा लाईट पाडा' असे सोनारणीला सांगावे. 'उचल्या' प्रकाशित झाल्यावर लक्ष्मण गायकवाडच्या जातभाईंनी हलकल्लोळ केला, तो त्याने 'घरची' भाषा फोडली, म्हणून!

घरच्या भाषेत हे सर्व येते कुठून? इतिहास, भूगोल, शिक्षण, आर्थिक परिस्थिती सर्व-सर्व घटक त्याला जबाबदार असतात. छत्रपती आणि पहिल्वान यांचं गाव असल्यामुळं फक्त कोल्हापुरात एक बाई दुसरीला 'तुला काय सांगू, मर्दिनी' असं म्हणते. 'चिंच जसजशी मोठी होते, तसतशी जास्त आंबट होते' ही लोकोक्ती आंध्रशिवाय कुठे असेल? देशावर सर्वांत लहान माप चिमूटभर, तर कोकणात तेच नखभर. कारण तिथे नखभरालाही किंमत आहे. 'गुड मॉर्निंग' ला गोवा- सावंतवाडीत 'पेज पियालास, रे' म्हणतात, तर माणदेशात 'भाकर खाल्ली का' म्हणतात. जो आहार, त्यानुसार शब्द! भाकरी खाणारे (कोरडी म्हणून) भाजीला 'कोरड्यास' म्हणतील. भात खाण्यासाठी कालवावा लागतो, म्हणून जोडीला 'कालवण'. उच्चभ्रूंच्या जेवणात डावी बाजू, उजवी बाजू भरगच्च म्हणून त्यांचा शब्द अनेकवचनात 'तोंडीलावणी.' सामाजिक संकेतांमुळेही अशी भाषा बनवावी लागते. शाकाहाऱ्यांचे सोवळे बिघडेल, म्हणून बिचाऱ्या मांसाहारी माणसांना सांकेतिक शब्द वापरावे लागतात. दाती, पिसारं, शेवाळं, तिसऱ्या, खुवे, गटगटे, चिंबोऱ्या, सुंगटं, जवळा असं काही तरी आणायला सांगताना, शेजारीण आलीच, तर त्या शब्दाचा अर्थ प्रसंगी 'शेवग्याच्या शेंगा' असा सांगितला, तरी चालतो. भाषा आणि अन्न दोन्हींसाठी जीभ एकच. म्हणून तर 'बाई कशी भरल्या चिंबोरीसारखी हवी' हे रसिक उद्‌गार कायस्थाचे; कोकणस्थाचे नव्हेत. शिव्या हा तर घरच्या भाषेचा अगदी आर्ष आविष्कार! कागदावर लिहिताना फुल्याफुल्या मारून काम भागवता येते. पण वेळेला जिभेवर अस्सल शिवी येणे हा स्वभाषकाचा घरच्या भाषेने दिलेला जन्मसिद्ध

हक्क आहे. प्रयोगादाखल 'साला' ही शिवी एकदा हिंदीत आणि एकदा मराठीत देऊन पाहावी. त्यातली घरची कोणती आणि दारची कोणती, हे 'वजना' वरून समजते.

प्रमाणभाषा ती दारची, म्हणजे घराबाहेरची आणि चार भिंतींच्या किंवा उंबऱ्याच्या आतली, ती घरची, हे शब्दशः खरे नाही. ते काही 'सौभद्रा' तले पडदे नाहीत. जंगल म्हटले, की जंगल; महाल म्हटले, की महाल. दुकानात कपड्यांची खरेदी चालते. तेव्हा 'सूत शंभर नंबरी आहे, की साठ?' 'त्या घोरपडीला काय करायचंय् गर्भरेशमी?' हे संवाद एकाच संचात पण दोन वाहिन्यांमध्ये असतात. कधी प्रसंग असतो अगदी घरगुती मुलगी दाखवण्याचा. या वेळी अवघडलेल्या वधूपित्याची भाषा शंभर टक्के औपचारिक, संभावित, भारदस्त असते. 'आपले वास्तव्य', 'चिरंजीवांचे स्नेही', 'आपल्या बंधूंना मी ओळखतो' वगैरे वगैरे. माणसांच्या नावातही बदल होतात. पाळण्यातल्या नावाबरोबर शाळेत गेल्यावर आडनाव चिकटते. तिथेही शाळूसोबती बेली, तेंडल्या असे घरगुती रूप करतात. कार्यालयात साहेब आले/ बाई आल्या यांचा वापर बिनरंगी असतो. 'तो खवीस/सासरा/ बाप आला.' 'ती बया/म्हैस आली' हे खाजगी वर्तुळातच बोललं जातं. घरच्या भाषेतल्या शब्दांमागे संस्कार कारणीभूत असतात. माझे आजोबा आजीचा उल्लेख 'बारावा गुरू' असा करायचे. बारावा गुरू हा ज्योतिषात व्यावसायिक शब्द आहे. पण इथे त्याचा संदर्भ आजीच्या स्वभावाशी होता.

कधी घरच्या-दारच्या नावातली रेघ स्पष्ट दिसते. शाळेत असेपर्यंतचा 'अशोक' कॉलेजात गेला. त्याच्या हुशारीचे कौतुक असलेले त्याचे प्राध्यापक अ. रा. भागवत वर्गात विद्यार्थी न दिसल्याने चौकशीसाठी घरी आले. त्यांनी विचारले, 'केळकर आहेत का?' अशोकच्या आईला वाटलं, की ते अशोकच्या वडलांकडे आले आहेत. बऱ्याच वेळाने त्यांच्या लक्षात आलं, 'म्हणजे अशोक होय!' मुलगा वडलांच्या बरोबरीचा झाला, हे केवळ त्यांच्या वहाणा मुलाच्या पायाला आल्यावरून समजतं, असं नाही. वडलांची पदवीही बाहेरचे लोक त्याला द्यायला लागतात. (आठवण डॉ. केळकरांनी सांगितलेली.)

घरच्या भाषेत काय काय असते, हे मराठी ज्यांची स्वभाषा आहे, त्यांना सांगण्याची गरज नाही. घरची भाषा काय काय व्यक्त करू शकते, त्याचीही फोड करण्याची गरज नाही. परात आणि काटवट, नॉनव्हेज आणि बरबाट किंवा भुजणं, चपाती किंवा पोळी (पदार्थ तोच), शर्ट-सदरा-कुर्ता-कुडतं-झब्बा-पैरण-अंगरखा असे अनेक पर्याय; इतकंच काय, आबा-बाबा, बामनाच्या काकी आणि जोशीकाकू यांतून बोलणाऱ्याने कोणता शब्द निवडला आहे, एवढं समजलं, की पुरे. सामाजिक भाषाविज्ञानात गती असलेला बोलणाऱ्याचं मूळ ठिकाण, जात, इ. सांगू शकेल. लुगडं, साडी, दंडिया, धडुतं, उभंलावणं, चिरगुटं, चिरडी, परवंटा, मुकटा, कद, दंड घातलेलं लुगडं, इ. शब्दांतले किती शब्द हरवले, याची मोजदाद होते फक्त घरच्या भाषेत. किती

घरात मुलं आईला मम्मीसुद्धा न म्हणता मामी, काकू, वहिनी किंवा वडलांनाही नाना, अप्पा, अहो सुद्धा म्हणताना दिसतात. ती दारची भाषा त्यांना माहीत नाही, म्हणून नव्हे! माणसांचं कशाला, देवाचं नाव घेतानाही प्रत्येकजण इट्टला पांडुरंगा, बाबा इरुबा, शिवशिव, जगदंब, हरहर, मंगेशा यांपैकी एकच – तेही घरच्या भाषेत म्हणतात. ज्यांचा देव एक आहे, ते मात्र घरीदारी एकाच नावाने धावा करतात.

घरची भाषा दारच्या भाषेला खूप काही देत असते. शब्दसंग्रह, म्हणी, वाक्प्रचार, इ. 'कारूनारूं' नी लिहिले, तर मराठी भाषा समृद्धच होईल, असे बापूसाहेब माट्यांनी 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' या निबंधात आग्रहाने सांगितले होते. 'बामणाचं काम न् सा म्हैनं थांब' किंवा 'भावीण नाचते म्हणून न्हावीण नाचते' आणि 'केला काटेसावरीला मलमलीचा आह्वेर' ह्या म्हणी भाषेला सातारा, गोवा आणि कापसाचा वऱ्हाड–खानदेश यांनी दिल्या. 'खिशात न्हाई आना आन् मला पाटील म्हना' ही म्हण देशावरच. कारण कोकणात पाटील नाही, खोत असतो. उलट, दळवींच्या 'महानंदे'च्या काळातली भावीण. 'पेजेसाठी शेज सजवावी लागते' म्हणेल. देहविक्रयातलं दुर्दैव तेच असलं, तरी घाटावर पेज नाही, म्हणून ती म्हणही नाही. माझे एक प्राध्यापक स्नेही माझ्या म्हणींच्या वापरावर भुवई उंचावायचे. त्यांना वाटे, की कार्यालयात येता जाता काय म्हणी वापरायच्या? पण मी दोन पणज्या, चार आज्या आणि सहा काकूंमधे वाढले. वर्गात, लेखात, भाषणात प्रमाणभाषा वापरली, तरी मोकळेपणाने बोलताना 'शेलकी' म्हण वापरल्याशिवाय माझं बोलणं पूर्ण होत नाही.

घरच्या भाषेचं देणं इथंच संपत नाही. अखेर हीच आहे खऱ्या साहित्याची भाषा. ज्ञानेश्वर, संतमंडळ, तुकाराम, होनाजी नंतर लक्ष्मीबाई टिळक, बहिणाबाई, माडगूळकर, नेमाडे आणि शेजारचे भैरप्पा, अनंतमूर्ती सर्वांचे सकस साहित्य घरच्या भाषेत आहे. ज्या ज्या वेळी पंडिती किंवा अव्वल इंग्रजीत बुकिश भाषेचा पगडा होता. तेव्हा फक्त वामनपंडित आणि विष्णुशास्त्री निर्माण झाले. 'लीळाचरित्र', 'गोविंदप्रभुचरित्र', 'स्मृतिस्थळ', इ. महानुभावांचे गद्यग्रंथ त्या काळातली माणसामाणसाची भाषा दाखवतात. एकदा गोविंदप्रभु 'आइता' बनवायला सांगतात. शिष्या त्याला 'ढीढरे' म्हणते. काय म्हणावे, यावर चांगली वादावादी होते. आजही घावण, धिरडं, आंबोळी, दोसा, पोळा इतकी नावं धारण करणाऱ्या या पदार्थाला चंद्रपूरवासी 'आइता'च म्हणतात. भाकरी-चपातीची पूर्वतयारी लक्षात घेतली, तर ह्या 'इन्स्टंट' नावाची अन्वर्थकता पटते. ज्ञानेश्वरांची ज्ञानभाषा संस्कृत, ग्रंथभाषा प्रवचनातली प्रौढ मराठी होती. पण अभंग, विराण्या लिहिताना ते 'दहिभाताची उंडी' म्हणतात. एकटी अनाथ जनी 'माझ्या जनीला नाही कोणी' अशी खंतावते. पण 'जनी जाये पाणियासी, मागे धावे हृषीकेशी' अशी घरची सोबत सांगते. चोखा डोंगा आहे. वाकडा नाही. 'हरिनामाची सांगड आणा' ऐवजी 'हरिनामाचे भोपळे आणा' म्हणून कसे चालेल? घरच्या भाषेत अभंग लिहिले, म्हणून तर ते आजही वारकऱ्यांच्या जिभेवर आहेत.





अनुक्रमणिका

तुकारामाच्या बावनकशी भाषेवर पुस्तकी टीकाकारांनी टीका केली, तेव्हा ती घरची अस्सल भाषा समजण्याची त्यांची कुवत उघडी पडली. होनाजीचीच भूपाळी अमर का? तो गवळी होता. त्याच्या घातपाताने मृत्यू होईपर्यंत त्याची विधवा आई जिवंत होती. तीच यशोदेच्या मुखातून कृष्णाला म्हणाली, ''हे माझे सावळे पाडसे, उठि, कृष्णाबाई.' मर्ढेकरांनी लिहिले,

'माय असते बाईल जरी नाही

प्रीतिवंता तशि प्रीतिवंचिताही'

यात पहिली ओळ घरची, तर दुसरी दारची हे उघड आहे.

आधुनिक साहित्यातही असे नमुने सापडतात. लक्ष्मुंबाई 'मग मीही मुरडकानवला खाल्ला' असे म्हणतात. बहिणाईचा भाषाविचार खुलासेवार असतो. घरोटाबद्दल बोलताना 'वानीबामनाचं जातं' असा टोमणा मारून ती म्हणते - 'ज्याच्यातून येतं पीठ, त्याले जातं म्हणू नही' मग काय म्हणावं? - 'कसा घरघर चाले, त्याले म्हनवा घरोट.'

'सर्व्या दुनियेचं पोट भरनाऱ्या कर्त्या पुरुषासारख्या घरोटाला जातं? छे! 'बनगरवाडी'त धनगर तरुणीवर भाळलेला जवान 'बाभळ सवळावीशी वाटली, ग' असं खुल्लमखुल्ला मनात काय आहे, ते सांगतो. मराठी कादंबरीत तर्जनी आणि भ्रुकुटीची फोलकटं फार झाली, तेव्हा मग नेमाड्यांनी 'थेट' मराठीत शंभरातल्या नव्व्याण्णवांसाठी लिहिलं. त्यांच्या कादंबरीत सधन शेतकरीणही रोज शेतात कामावर जाते. कुणी, का जातेस, म्हटलं, की उसळून म्हणते, 'मग घरात बसून काय फोद्याला वारा घेत राहू?' आक्षेप घ्यायचा, तर तो तर्जनीला– ह्या भाषेला नाही. पहिल्या पावसासारखं आलेलं दलित साहित्य जर प्रौढ-प्रमाणभाषेत लिहिलं, तर नळाच्या पाण्यासारखं वाटेल.

याच कारणासाठी शिवाजी महाराजांनी दारच्या फारशीचे उच्चाटण केले. अष्टप्रधानांपासून सर्वांना सुंदर पदनामे दिली. (आता मात्र भारताच्या पंतप्रधानांना वजीरेआजम म्हणायचे घाटतेय्.) राजांनी 'राज्यव्यवहारकोश' लिहून घेतला; 'आज्ञापत्रा' ला प्रेरणा त्यांचीच. 'अखंडलक्ष्मीअलंकृत' पासून 'लेखनसीमा' पर्यंत कामकाजाच्या पत्रांचा लेख मराठी बनवला. त्यांनी घरची भाषा जाणीवपूर्वक राजभाषा बनवली नसती, तर काय झाले असते, ते भूषणकवीने लिहून ठेवले आहे. घरची भाषा म्हणजे चूलमूलवाल्या बायाबापड्यांची भाषा, ह्या भ्रमात राहू नये. दारच्या भाषेला सामर्थ्य येण्यासाठी घरच्या भाषेतला 'कस' ओळखायला हवा. ऐहिकातली असोत वा पारलौकिक, सर्व प्रकारची आक्रमणे परतवणारी केवळ स्वभाषाच असते. माणसाला स्वभाषा उत्तर्म का यावी; प्रत्येकाला स्वभाषेचे/स्वभाषेतून शिक्षण; निदान बाळकडू तरी का मिळावे, हे वरील विवेचनावरून कळावे, अशी आशा आहे.

**पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेक्कन कॉलेज, पुणे ४११००६.**



भाषानिरीक्षण

# शब्द जेव्हा कात टाकतात...

**नीलिमा गुंडी**

आपण सहज म्हणून उच्चारलेले शब्द लहान मुलांना अक्षरशः टोचू शकतात; याची जाणीव आपल्याला कितपत असते? माझंच उदाहरण पाहा.

मुक्ता दुसरीत असतानाचा हा अनुभव आहे. साधारणतः पाच वर्षानंतर अधिकाधिक हट्ट करणे, समजून न समजल्यासारखे वागणे, चेंगटपणा करणे इ. कलांमध्ये ती पारंगत होऊ लागली होती. एकप्रकारे आईला त्रास देण्याचा वयाच्या दृष्टीने तिला असलेला हक्क ती इमानेइतबारे बजावीत होती. कधीतरी माझ्याही सहनशीलतेची परिसीमा व्हायची आणि मी न राहवून तिला 'मूर्ख', 'आळशी' असे म्हणून जायचे! (तसा आईलाही थोडा हक्क असतोच की! 'म्हण'च नाही का?- मांजरीचे दात पिल्लाला लागत नाहीत!) तिला ते शब्द अगदी सहन होत नसत.

एकदा माझ्या तोंडून निघालेल्या 'मूर्ख' या अपशब्दाने चिडून डोळ्यात राग आणि अश्रू घेऊन ती माझ्यासमोर आली आणि मला म्हणाली, "आई, तू मला मूर्ख नि आळशी म्हणू नकोस." 'मूर्ख' मधला रफार एखाद्या कोयत्यासरखा तिच्या मनावर जणू घाव घालून गेला होता. (आणि 'आळशी' हा शब्द त्यातल्या शेवटच्या अक्षरामुळे तिला अगदी आवडत नसल्याचे तिने मला नंतर सांगितले!) रागातही तिनेच मला पर्याय सुचवला, "आई, तुला जेव्हा माझा राग येईल तेव्हा मला तू 'ससोबा' म्हण." (म्हणजे तिचं वागणं चुकतं, मला राग येतो, ते शब्दांत व्यक्त करावासा वाटतो- हे सारं तिला मान्य होतं. प्रश्न होता फक्त 'शब्दांचा!') खरंच! 'ससोबा' असं कितीही जोरात चिडून म्हटलं तरी त्याचा कानामनावर ओरखडा उमटणार नाही.

तीच पुढे म्हणाली, "तू 'ससोबा' म्हटलंस की मी ओळखीन- माझं चुकलं आहे. आणि जेव्हा मला तुझा राग येईल; (ही शक्यता तर मी गृहीतच धरली नव्हती%) तेव्हा मी तुला 'खारूताई' म्हणेन."

मी तिचं म्हणणं एकदम मान्य केलं. 'मूर्ख' आणि 'आळशी' हे शब्द अगदी असंसदीय समजून बाद करून टाकले. एखाद्या शब्दात नव्या अर्थाची प्रतिष्ठापना कशी होते; हा अनुभव आम्ही तेव्हापासून घेत आहोत. घरातलं वातावरण खेळीमेळीचं व्हायला नव्या शब्दांची मदत होत आहे.

**३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, ५ वी गल्ली, पुणे ४११००२.**



पुस्तकपरीक्षण

# मराठी भाषावैज्ञानिक लेखनातला महत्त्वाचा टप्पा

माधवी आपटे

(परीक्षित पुस्तक : आधुनिक भाषाविज्ञान, सिद्धान्त आणि उपयोजन, ले. मिलिंद स. मालशे, प्रकाशक लोकवाङ्मय गृह, मुंबई, फेब्रुवारी, १९९५)

डॉ. मिलिंद मालशे यांनी 'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धान्त आणि उपयोजन' (लोकवाङ्मय गृह, फेब्रुवारी, १९९५) हे पुस्तक लिहून मराठीत प्रकाशित झालेल्या भाषावैज्ञानिक ग्रंथांच्या मालिकेत मोलाची भर घातली आहे. आतापर्यंत लेखसंग्रहांच्या स्वरूपात काही पुस्तके मराठी अभ्यासकांची भाषावैज्ञानिक गरज भागविण्याची कामगिरी बजावत होती; परंतु मालशेंच्या नव्या पुस्तकाने खालीलप्रमाणे गोष्टी साध्य केल्या आहेत:

अ) सुसूत्रपणे मांडलेले आधुनिक भाषा-वैज्ञानिक सिद्धान्त आणि उपयोजित अभ्यासक्षेत्रांची ओळख

ब) पद्धतशीर विवेचन असलेले आणि पाठ्यपुस्तकाची उणीव भरून काढणारे एकत्रित लिखाण

क) पारंपरिक आणि आधुनिक भाषाभ्यास पद्धतींचा एकत्रित विचार

ड) प्राचीन भारतीय भाषाविज्ञान आणि आधुनिक भाषाविज्ञान यांचा संबंध दाखविणारी चर्चा

ई) भाषाविज्ञानाशी निगडित भाषाभ्यास शाखांची पद्धतशीर ओळख

फ) मराठीमधे उपलब्ध करून दिलेले संज्ञापर्याय (परिभाषासूची)

या पुस्तकाची लेखनपद्धती आणि मांडणी यांमधून मालशेंच्या मनावर उमटलेला John Lyons यांच्या An Introduction to Theoretical Linguistics या पुस्तकाचा ठसा लक्षात येतो. अर्थात तरीही मालशेंचा स्वतःचा व्यासंगही प्रकर्षाने जाणवल्याशिवाय राहत नाही. चपखल अशी मराठी भाषेतील विविध उदाहरणे आणि तौलनिक चर्चा यांतून मालशेंचा व्यासंगही स्पष्ट होतोच.

त्यांच्या लेखनाचे सर्वांत महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे, त्यांनी केलेले चॉम्स्कीच्या भाषावैज्ञानिक सिद्धान्तांबाबतचे लेखन. मराठीमधून डॉ. अशोक केळकर व इतरांनी संरचनावादी भाषाविज्ञानावर लेखन केले होते. परंतु डॉ. मालशेंनी प्रथमतः चॉम्स्कीची ओळख मराठीच्या अभ्यासकांना करून दिली. या पुस्तकातील चॉम्स्कीच्या सिद्धान्तांबद्दलचे साक्षेपी लेखन हे त्यांचे मोलाचे योगदान आहे. यामुळे मराठीच्या अभ्यासकांना त्यांनी विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात आणून सोडले आहे. मालशेंनी ३ ऱ्या प्रकरणात संरचनावादी अर्थविचाराची चर्चा केली आहे. तशीच जर त्यांनी निर्देशनात्मक अर्थविचाराची ही तोंडओळख करून दिली असती, तर? चॉम्स्कीच्या सिद्धान्तांपासून प्रेरणा घेऊन, परंतु विभक्तपणे काही भाषावैज्ञानिकांनी निर्देशनात्मक अर्थविचार (Generative Semantics) मांडला, तो का व त्यांना कितीसे यश मिळाले ?/का मिळाले नाही ? याचा अंतर्भाव करता आला असता.

या पुस्तकाचे आणखी एका मोलाचे वैशिष्ट्य म्हणजे, प्राचीन भारतीय भाषावैज्ञानिक परंपरा आणि आधुनिक भाषावैज्ञानिक परंपरा यांचा तौलनिक आणि एकत्रित विचार. भारतीय मुनित्रयांनी (पाणिंनी, कात्यायन, पतंजली) मिळून संस्कृत व्याकरणासंबंधी जे लिखाण केले, त्यात मूल्यनात्मक, आदेशात्मक भाग होता, तसाच भाषिक बदलांचे तर्काधिष्ठित स्पष्टीकरण (language change and its logical explanation) लाघव (Economy) आणि असंदेह म्हणजे शास्त्रीय वर्णनाची सुस्पष्टता, सुव्यक्तता (explicitness in linguistic description) हाही भाग होता, हे प्रकरण ३ मधे (पाने : ४८-४९) मालशे यांनी चर्चेस घेऊन अमेरिकन भाषाविज्ञानाचा भारतीय परंपरेशी असलेला घनिष्ठ संबंध या प्रकरणात स्पष्ट केला आहे. कोणत्याही भाषेचे शास्त्रशुद्ध व्याकरण मांडताना अनेक भाषापंडितांचे योगदान त्यात समाविष्ट असते आणि अंतिमतः जेव्हा पाणिनीसारखा भाषापंडित 'अष्टाध्यायी' सूत्रबद्ध करतो, तेव्हा तत्पूर्वी त्यावर पुष्कळसे संशोधन होऊन ती प्रक्रिया पूर्ण झालेली असते. अमेरिकन अथवा पाश्चात्त्य भाषावैज्ञानिक संशोधनाची प्रेरणा आणि दिशा ही शास्त्रशुद्ध संस्कृत व्याकरणाशी निगडित आहे आणि सद्यःस्थितीत जरी पाश्चात्त्य भाषाविज्ञान परंपरा विविध प्रायोगिक सिद्धान्त पडताळून पाहण्यात हरवल्यासारखी वाटत असली, तरी अनेक भाषापंडितांच्या प्रयत्नांतूनही ही परंपरा भविष्यात सुसूत्र व्याकरण- मीमांसा आणि सूत्रबद्ध व्याकरण देऊ शकेल, असे मानायला जागा आहे. मराठीमधे अमेरिकन भाषावैज्ञानिक संकल्पनांच्या अभ्यासाची सुरुवात ही अमेरिकन किंवा पाश्चात्त्य गुलामीचे लक्षण आहे आणि तिकडे टाकाऊ झालेले अभ्याससक्षेत्र आपण गुलामीतून आपलेसे केले आहे, असा काही विद्वानांचा दृष्टिकोन जरी असला, तरी मालशेंनी निर्देशित केलेले भाषावैज्ञानिक परंपरांचे संबंध लक्षात घेता, नवीन अभ्यासकांना दोन गोष्टी लक्षात घेता येतील :

१) इंग्रजी भाषाविज्ञानाचा आणि पर्यायाने इंग्रजी भाषेचा अभ्यास अतिशय उपयुक्त

आहे.

२) संस्कृत भाषाविज्ञानासाठी संस्कृत भाषेचाही सखोल अभ्यास अतिशय उपयुक्त आहे, मराठीसाठी उपकारकही आहे.

अलिकडच्या मराठीच्या विद्यार्थ्यांमधे या दोन्ही भाषांच्या अभ्यासाची फारशी गरजच नसल्याची प्रवृत्ती प्रखरतेने बळावलेली आहे. उथळ आणि सवंग विधाने करून राजकीय पुढारी आणि पुढारी-विद्वान विद्यार्थ्यांची दिशाभूल करतात. मालशेंसारख्या मान्यवर अभ्यासकाने या प्रकारच्या विचाराला निष्प्रभ ठरवले आहे आणि लक्षणीय काटशह दिला आहे, हे दखलपात्र आहे.

'उपयोजन' या दुसऱ्या विभागात उपयोजित भाषाविज्ञानांतर्गत अभ्यासक्षेत्रांची ओळख करून देण्याचा प्रयत्न खचितच गौरवपात्र आहे. यांतल्या काही अभ्यासक्षेत्रांवर पूर्वी लिखाण झाले असले, तरी सुसूत्र, एकत्र लिखाणाला अनन्यसाधारण महत्त्व आहे. ५ व्या प्रकरणात उपयोजित भाषाविज्ञान व भाषाध्यापन, तसेच, ६ व्या प्रकरणात सामाजिक भाषावैज्ञानिक संकल्पनांमध्ये आलेल्या वैशिष्ट्यपूर्ण संकल्पना (भाषा संपर्क, दुपदरी भेद, द्विभाषिकता, बहुभाषिकता, पिजिन व क्रिओल, भारतीय इंग्रजी, इ.) या माझ्या मते प्रथमच मराठीतून मांडल्या गेल्या आहेत. पिजिन आणि क्रिओल यांच्यासाठी मराठी पर्यायी संज्ञा वापरणे शक्य झाले असते, की काय, असा विचार येऊन गेला. पिजिनला 'मिश्रभाषा' किंवा 'मिश्रितभाषा' आणि क्रिओलसाठी 'मिश्रविकसितभाषा' किंवा 'विकसितमिश्रभाषा' अशा संज्ञांचा विचार करता येईल.

८ व्या प्रकरणातील 'भाषिक चुकांचे विश्लेषण' (Error Analysis) चर्चेला घेऊन मालशेंनी आणखी एक नवा विषय मराठीच्या अभ्यासकांना सादर केला आहे. इथून पुढे मनोवैज्ञानिक भाषाविज्ञानाबद्दल लिहिणे सुकर होईल. या विषयाची ओळख ही भाषा आत्मसात करण्याच्या प्रक्रियेचा अभ्यास करू इच्छिणाऱ्यांना प्रेरणादायक ठरेल.

विशेष उल्लेखनीय म्हणजे, मालशेंनी इंग्रजी भाषेतील 'भविष्य काळ' या संकल्पनेचीही चर्चा या पुस्तकात आणल्यामुळे सर्व भाषांमधे 'काळ' ही संकल्पना एकसारखी वापरली जात नाही, याचीही जाणीव मराठी भाषेच्या विद्यार्थ्यांमधे प्रसृत होईल, व्याकरणाकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलेल.

पुस्तकाच्या शेवटी दिलेली इंग्रजी-मराठी परिभाषासूची हा या पुस्तकातील अतिशय उपयुक्त आणि विशेष महत्त्वाचा भाग आहे. कोणत्याही विषयाचे आपल्या भाषेत लिखाण करायला पर्यायी संज्ञा फारच महत्त्वाच्या असतात. मला विशेषकरून जाणवलेले काही पर्यायी संज्ञावाचक शब्द असे : aphasia वाचानाश, वाचाभंग; arbitrary यादृच्छिक; language acquisition भाषार्जन ; pragmatics कार्यलक्ष्यी मीमांसा, इ. परंतु aptitude या संज्ञेला अभिवृत्ती हा पर्याय खटकला,

कारण अभिवृत्ती हा शब्द attitude यासाठी आधीच प्रचलित आहे. aptitude मधे शिकण्याची आवड + कौशल्य या दोन्हींचा समावेश आहे. त्यामुळे aptitude या संज्ञेला पर्याय म्हणून 'रुचिकुशलता' वापरणे अधिक योग्य होईल, असे वाटते.

काही नगण्य अशा हरकती जरी मी या परीक्षणात उपस्थित केल्या असल्या, तरी हे पुस्तक म्हणजे मराठी भाषावैज्ञानिक लिखाणामधला अतिशय महत्त्वाचा टप्पा आहे, यात दुमत असण्याचे कारण नाही.

**ऑगस्ट इन्स्टिट्यूट फर कम्यूनिकेशन डायनॅमिक्स, सदनिका क्र. १६,**
**मुथियान कॉर्नर, नवीन उस्मानपुरा, औरंगाबाद ४३१००५.**



---

**उलटाच परिणाम**

मोरोक्कोमधल्या अरबी वृत्तपत्रात ॲस्पिरिनच्या गोळ्यांची एक भली मोठी जाहिरात झळकली. त्या जाहिरातील फक्त तीन चित्रे होती. डावीकडच्या चित्रात रडव्या चेहऱ्याचा एक माणूस दाखवला होता. मधल्या चित्रात तो माणूस A SPIRIN ही अक्षरे असलेल्या बाटलीतील गोळी घेत आहे असे दाखवले होते आणि तिसऱ्या उजवीकडच्या चित्रात तो माणूस हसतो आहे असे दाखवले होते. जाहिरातीमध्ये इतर कोणताही मजकूर नव्हता.

ही जाहिरात लोकांनी वाचल्यानंतर ॲस्पिरिनची विक्री वाढेल; आपला पगारही वाढेल अशी दिवास्वप्ने तो प्रसिद्धी अधिकारी पाहात होता. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे ती जाहिरात प्रसिद्ध झाल्यानंतर ॲस्पिरिनची एकही गोळी विकली गेली नाही. या प्रकाराची चौकशी करता त्याला असे समजले की अरबी लिपी उजवीकडून डावीकडे अशी वाचतात. त्यामुळे उजवीकडच्या चित्रात दाखवलेला हसरा माणूस त्या बाटलीतल्या गोळया घेतल्यानंतर डावीकडच्या चित्रात दाखवलेल्या माणसाप्रमाणे विव्हळतो आहे, असा अर्थ वाचकांनी लावला. ते त्या औषधापासून दूर राहिले.

हे समजल्यारव त्या परदेशी अधिकाऱ्यावर डोक्याला हात लावण्याची वेळ आली.

**(क्रॉसकल्चर, स्प्रिंग १९९१, पृ. २३वरून साभार)**

**शकुंतला क्षीरसागर,**
**२९/४१८, लोकमान्यनगर पोस्टाजवळ, पुणे ४११०३०.**





अनुक्रमणिका

# वर्ष १३, १९९५ ची लेखनसूची

**लेखकसूची**

## लेखन सूची

मला उत्तर हवंय/ सत्त्वशीला सामंत/१३:१ हिवाळा/१९

मुद्रणप्रत आणि मुद्रणसूचना/दीपक घारे/१३:३ पावसाळा/१०

लहान आणि मोठे/वर्षा सहस्रबुद्धे/१३:१ हिवाळा/३२

व्हॅलन्स थिअरी : धारणाक्षमता विचार/नीती बडवे/१३:४ दिवाळी/५

शब्दसृष्टी, ईश्वर आणि रूमी (धन परक्याचे)/विद्युल्लेखा अकलूजकर/१३:१ हिवाळा/३४

शब्द जेव्हा कात टाकतात (भाषानिरीक्षण) नीलिमा गुंडी / १३:४ दिवाळी/७०

शब्दांच्या गावा जावे (भाषा निरीक्षण)/नीलिमा गुंडी/१३:२ उन्हाळा/१६

संतसाहित्यातील कथनसरणी/ माधव ना. आचार्य/१३:२ उन्हाळा/४

संपूर्ण बाळकरामबद्दल/वसुधा माने/ १३:१ हिवाळा/५१

संपादकीय/मृणालिनी शहा/१३:२ उन्हाळा/१

ज्ञाननिष्पत्ती, अर्थनिष्पत्ती आणि भाषाविज्ञान/शैलेश सदाशिव पुंडलीक/१३:३ पावसाळा/१८

ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषेवर कन्नडचा प्रभाव : काही निरीक्षणे (पुस्तक परीक्षण) पंडित आवळीकर/ परीक्षित पुस्तक : ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषेवर कन्नडचा प्रभाव, ले. रंगनाथ शामाचार्य लोकापुर, निशांत प्रकाशन, बेळगाव, फेब्रुवारी १९९४/१३:२ उन्हाळा/५१



# परिषद वार्ता

**आमची अडचण**

भाषा आणि जीवनच्या १३:२ उन्हाळा १९९५ च्या अंकात श्री. दिवाकर मोहनींचा 'मराठीची लेखनपद्धती आणि शुद्धलेखन' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यात त्यांनी आपल्या प्रचलित लेखनपद्धतीतील त्रुटी स्पष्ट केल्या आहेत. त्यांच्या उपपत्तीनुसार आपल्या लेखनातील काही सदोष उदाहरणे त्यांनी दिली आहेत आणि त्यांची निर्दोष रूपेही दिली आहेत. पण मुद्रणालयाची अक्षरचिन्हे सदोष पद्धतीतीलच असल्याने सदोष आणि निर्दोष उदाहरणे सारखीच आली आहेत. आता या परिस्थितीत आमचाही नाइलाज झाला. तरी पण त्यांची जी अडचण झाली आहे तिच्याबद्दल आम्ही दिलगीर आहोत.

**महाराष्ट्र फाउंडेशनचे पारितोषिक**

मागील अंकात 'भाषा आणि जीवन'ला महाराष्ट्र फाऊंडेशनचे पारितोषिक मिळाल्याचे प्रसिद्ध झाले होतेच. या पारितोषिकाच्या वितरणाचा सोहळा मुंबई येथे शनिवार दि. ६ जानेवारी १९९६ रोजी रवीन्द्र नाट्यगृहात मोठ्या दिमाखाने पार पडला. सुप्रसिद्ध हिंदी साहित्यिक श्री. भीष्म सहानी यांच्या हस्ते ही पारितोषिके देण्यात आली. दि. ७ जानेवारी १९९६ रोजी या सोहळयाला जोडूनच 'महाराष्ट्राचे सांस्कृतिक अभ्युत्थान आणि मराठी साहित्य' या विषयावर संपूर्ण दिवसाचे एक चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. हा पारितोषिक वितरण समारंभ आणि चर्चासत्र यात सहभागी होण्यासाठी डॉ. अशोक केळकर, कल्याण काळे आणि डॉ. सौ. मृणालिनी शहा हे उपस्थित राहिले होते.

**आभार प्रदर्शन**

भाषा आणि जीवनला महाराष्ट्र फाऊंडेशनचे पारितोषिक मिळाल्याचे जाहीर होताच भाषा आणि जीवनच्या अनेक चाहत्यांनी प्रत्यक्ष भेटून अथवा पत्राद्वारे अभिनंदन केले. चाहत्यांची ही संख्या एवढी मोठी होती की, प्रत्येकाला स्वतंत्रपणे पत्र पाठवून कृतज्ञता व्यक्त करणे अशक्य झाले. म्हणून या सर्व चाहत्यांचे या निवेदनाद्वारे आभार मानत आहोत. सर्वांनी पत्रिकेवरील लोभ असाच कायम ठेवावा.



## पैसे भरण्याबद्दल सूचना :

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डरकूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी :

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ६० रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५ रु.
- परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

## परिषदेची वर्गणी :

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त, आश्रयदात्यांसाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.

(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर :

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : 0-40048/83

- ● **आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार?**

➢ सभासद नसाल, तर प्रथम स्वतः सभासद व्हा.

➢ सभासद असाल, तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण / आजीव सभासद मिळवून द्या.

➢ परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर चिटणिसांशी संपर्क साधा.

➢ परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

➢ परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.

➢ परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

- ● **आपण पत्रिकेसाठी काय करू शकता?**

➢ लेखन पाठवा.

➢ परभाषांतून अनुवाद करा.

.व्हा.

➢ 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुराबद्दल सूचना पाठवा.

➢ भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.

➢ पत्रिकेत भाषा व्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते?

➢ जाहिरात मिळवून द्या.

➢ संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

**● संपर्क ●**

मराठी अभ्यास परिषद

१, शीतल अपार्टमेंट,

४६/४, एरंडवणे, पुणे - ४११ ००४.

(दूरध्वनी : ३३ ३८ ६९)




